श्री ब्रह्मीभूत श्री सदानंद महाराज उर्फ

बाबामहाराज उमरीकर ( जि० नांदेड )

विरचित ओवीबद्ध ग्रंथ

# देशिक लीलामृत

प्रकाशक :- श्री अमृतराव बाबामहाराज, उमरीकर.

प्रस्तावना :- श्री. विश्वेश्वरराव अंबादासराव कानोले.

शके १८५८



मुद्रक :- श्री. बाळकृष्ण गोपाळराव पारगांवकर
श्रीबाळकृष्ण मुद्रणालय औरंगाबाद

किंमत १ रुपया

श्री

# ग्रंथपरिचय

बहु ग्रंथ केले अध्यात्मिक ज्ञान । जेणें समाधान संत होती ।
क्षेत्र उमरींत ठेविले रक्षुनी । प्रगट करनी ~~म्हणून~~ सांगे ।
जयालागी चाड असे स्वरूपाची । करावी तयाची आठवण ।
गुरू देशिकाचा बोध जैसा झाला । तैसा प्रगटला शेष म्हणे ॥

[ शेषराव उर्फ सदानंद महाराज ]

देशिक-लीलामृत या ग्रन्थाचे कर्ते उमरी येथील प्रसिद्ध सत्पुरुष व संतकवि प. पू. श्री सदानंद उर्फ बाबा महाराज हे होत. हे अधुनिक काळांत फार थोर कोटींतील सत्पुरुष होऊन गेले यांत संशय नाहीं. मोंगलाईबाहेर जरी त्यांचें नांव ज्ञात झालें नसलें, तरी महाराजांच्या ग्रन्थप्रकाशनाचा जो स्तुत्य उपक्रम त्यांचे चिरंजीव श्रीअमृतरावमहाराज यांनीं आरम्भिला आहे. त्याद्वारें महाराष्ट्रांत महाराजांची कीर्ति सर्व-विश्रुत होण्यास फारसा कालावधि लागणार नाहीं असें वाटतें. आम्हीहि यथामति आतांपर्यंत महाराजांचें चरित्र, कुलवृत्तांत व ग्रन्थपरिचय या संबंधींची साग्र माहिती "उमरी मठांतील संशोधन" या नांवानें निजाम विजयादि पत्रांतून लेखमाला लिहून प्रसिद्ध केल्याचें सर्वांना विदितच आहे. अद्वितिय सत्पुरुषांत जशी त्यांची गणना आहे, तसेंच संतकवि या दृष्टीनेंहि त्यांचें ग्रन्थ व काव्यकर्तृत्व असामान्य दर्जाचें आहे, हें कोणांहि कबूल करील. उमरी मठांत महाराजांनीं स्वतः रचलेले व लिहून ठेवलेले वेदांतयोग अध्यात्म इत्यादि विषयावरील अडिचशे-पर्यंत लहान मोठे ग्रन्थ असून, त्यांत चरित्र, महाभाष्यटीका इत्यादि विविध विषयांचा समावेश आहे. स्फुट श्लोक व अभंग रचनाच केवळ पस्तीस हजारपर्यंत आहे. "पद्यरचना बहुत । अभंगाचा नाहीं अंत ।"

असें स्वत: महाराजांनीच एका अभंगांत म्हटलें आहे. आणि त्यांच्या ग्रन्थनिर्मितीसंबंधीं बोलावयाचें झाल्यास शिरोभागी जे त्यांच्याच शब्दांतील अवतरण दिलें आहे, त्यावरून योग्य ती कल्पना होण्यासारखी आहे. या विपुल ग्रन्थ भांडारांतून निवड करून सुन्दरविलास दीपिका नांवाचा महाराजांचा एक ग्रन्थ नमुन्यादाखल गतवर्षी प्रसिध्द करण्यांत आल्याचें वाचकांना स्मरतच असेल आणि येत्या कार्तिकमासांत येणाऱ्या पुण्यतिथीच्या निमित्तानें श्री देशिक लीलामृतनामक सुंदर ग्रन्थ प्रसिध्द होण्याचा योग घडून येत आहे, या बद्दल उमरी मठाचे विद्यमान मठाधिपति श्री अमृतराव महाराज यांचें सानंद अभिनंदन करणें अगत्याचें आहे.

श्री देशिक लीलामृत हा ओवीबध्द ग्रन्थ श्री सदानंद उर्फ बाबामहाराजांनीं आपले आजे व सद्गुरु श्री बाळकृष्ण महाराज यांचें चरित्र वर्णिण्याच्या हेतुनें रचला आहे. ज्या देशिक कृपेनें महाराजांना काव्यस्फूर्ति प्राप्त झाली व एवढा थोर अधिकार प्राप्त झाला त्यांचेंच साक्षात् चरित्र वर्णिण्याचा योग ज्या ग्रन्थांत आला, तो सहाजिकच रसाळ व गुरुकृपेनें प्रसादयुक्त झाला असल्यास नवल नाहीं. म्हणूनच " हा गुरुप्रसादिक ग्रन्थ । झाला असे महा समर्थ । याचा जाणोनि परम अर्थ । अनुभव घेईजे । ५१ । हे सकळ गुह्याचें सार । वेदाचें बीज अक्षर । अमृताचे पाझर सुटले असे । ५२ । ( अ. १४ )" असे जे धन्यतेचे उद्गार ग्रंथकर्त्यानें व्यक्त केले आहेत ते सर्वतोपरी सार्थ आहेत ग्रंथ रचण्याचें प्रयोजन सांगतांना "देशिकानंद सद्गुरू । मूर्तिमंत पूर्ण ईश्वरू । माझे हृदयीं संचारू । करी ग्रंथ रचनेसी । २० । या ग्रंथाचें नाम देशिक लीलामृत । लीलाचरित्र झालें जें समस्त । तयाचें अनुष्टुप करितों लिखित । श्रवण करा आदरें । २१ । ( अ. १ ला. )" इत्यादि ओव्यांनीं स्पष्ट केलें आहे, व त्याचाच अनुवाद ग्रंथांत ठिकठिकाणीं व्यक्त केला आहे. श्रीबाळकृष्ण महाराजांचें दीक्षानाम 'देशिकानंद' होतें. यास अन्वर्थक असेंच श्री देशिक लीलामृत हे नांव प्रस्तुत ग्रंथास

दिलें आहे. प्रस्तुत ग्रंथाचें चरित्रनायक श्री बाळकृष्ण महाराज हे ग्रंथकर्ते श्रीसदानंद महाराज यांचे आजे असून मोक्षगुरुहि तेच होते. उमरी मठाचे संस्थापक तेच हे श्री बाळकृष्ण महाराज होत यांना तात्या महाराज असेंहि म्हणत. हे सुप्रसिध्द आनंदसांप्रदायि श्री शुकानंद महाराज यांचे पट्टशिष्य असून थोर अधिकाराचे सत्पुरुष व संतकवि होते. या गुरु-शिष्याच्या जोडीचें वर्णन करतांना "शुकानंद ज्ञानसमुद्र। जैसा पौर्णिमेचा चंद्र। देवामाजी जेवी इंद्र। येणेंपरी सद्गुरु ।२४। बाळकृष्ण गुणाचि राशी। जैसा नक्षत्रामाजी शशी। तेवी अगाध सुकृतासी। सत् शिष्य जाणावा।२५।(अ. ८)" जे गौरवपर उद्गार व्यक्त केले आहेत ते सार्थच आहेत. श्री बाळकृष्ण महाराज हे धाकरच्या उध्दव चिद्घन या प्रसिध्द महाराष्ट्र कवीचे वंशज असून यांचें घराणें आंबेजोगाई येथें पुढें स्थायीक झाल्याचें दिसून येते. आंबेजोगाईस आल्यानंतर या घराण्याचे मुळ पुरुष कृष्णाजीपंत, पुढें विसाजीपंत व त्यांचे गदाधरपंत ही वंशपरंपरा. गदाधरपंत हे विद्वान व नैष्ठिक ब्राह्मण असून लाडे सिध्दांती होते. गदाधरपंताचेच प्रस्तुत ग्रंथाचे चरित्रनायक श्रीबाळकृष्ण महाराज हे पुत्र होत. पुढें श्री शुकानंद महाराजांचा बाळकृष्णांना अनुग्रह प्राप्त झाल्यानंतर त्यांची थोरवि विशेष वाढाली व सद्गुरु श्री शुकानंद समागमें असतांना नांदेड भागांतहि त्यांचा लौकिक विशेष झाला. शेवटीं अंतकाळीं नांदेड जवळील उमरी या गांवीं शिष्यवर्गाच्या आग्रहास्तव बालकृष्ण महाराज हे येऊन राहिले व शके १७९४ च्या कार्तिक महिन्यांत उमरी येथेंच त्यांचें देहावसान झालें. पुढें महाराजांच्या समाधिस्थानीं शिष्यवर्गांनीं मठ बांधल्यानंतर यांचे नातू प्रसिध्द सिध्द पुरुष श्रीसदानंदमहाराज यांनींहि आंबेजोगाई सोडून कायमचें उमरी येथें वास्तव्य केलें व याप्रमाणें उमरी मठाची स्थापना झाली.

प्रस्तुत ग्रंथाचे एकंदर चवदा अध्याय असून यांत चरित्रनायक श्रीबालकृष्ण महाराज यांचें चरित्र क्रमशः प्रत्येक अध्यायांतून थोडें बहुत वर्णिलें गेलें आहे. पहिल्या अध्यायांत उध्दव चिद्घनाचे वंशस्थ आंबानगरींत येऊन स्थायीक झाल्याचा उल्लेख करून चरित्रनायकाचे

वडील गदाधरपंत यांचें अख्यान दिलें आहे. दुसऱ्यांत बाळकृष्णांचा जन्म, बालक्रीला व विवाह यांचें सुरस वर्णन असून तिसऱ्या व चवथ्या अध्यायांत वेदाध्ययन, वतनवृत्तीचें कामकाज पाहणें व पैठणास नाथ समाधीच्या दर्शनास जाणें व परत स्वगृहीं येणें इत्यादि कथाभाग आला आहे. पांचव्यांत व्यापार उदीम करून धनसंचय करणें व चोरांनीं तें अकस्मात लुटल्यामुळें वैराग्यप्राप्ति होऊन ईशप्राप्तीकरितां आंबानगरींत मुकुंदराजाच्या स्थानापाशीं अनुष्ठान आरंभिणें इत्यादि कथाभाग आला आहे. सहाव्या अध्यायांत शिवाचें अतिथी वेषानें बालकृष्णास दर्शन व श्री शुकानंद महाराजांचा अनुग्रह घेण्याचा आदेश हा वृत्तांत आला आहे. सातव्यांत शुकानंद महाराजांचें आंबानगरीस आगमन, बालकृष्णास उपदेश व अनुग्रहप्राप्ति हा विषय आला आहे. आठ ते अकरा या चार अध्यायांत श्री शुकानंद महाराज हे नांदेड येथें बालकृष्णास ज्ञानोपदेश देतात असा कथाभाग असून ब्रह्मज्ञान विवरणपर असे प्रस्तुत अध्याय अध्यात्मिक व्याख्यान या दृष्टीनें मुमुक्षुजनांस बोधपर असल्यामुळें महत्वाचे व वाचनीय आहेत. बाराव्या अध्यायांत बालकृष्ण महाराजांचा तिर्थाटन निमित्तानें घडलेला संचार व लीला-चमत्कार हा कथाभाग आला आहे. तेराव्या अध्यायांत परभणीच्या साधुबाईनामक शिष्येवर अनुग्रह, हैद्राबादेस महाराजा चंदुलालकडून सत्कार व श्री शुकानंद महाराजांच्या वसमत येथील मठास धनगांव जाहगिर मिळविणें इत्यादि वृत्तांत आला आहे. चवदावा अध्याय हा कळसरूप असून त्यांत बालकृष्ण महाराजांचें डमरी येथें आगमन, चंद्रचूड यांनींवारनें संन्यासदीक्षा ग्रहण व परमधामास गमन हा कथाभाग आला आहे. याच अध्यायाच्या शेवटीं ग्रंथाची फलश्रुति व ग्रंथ सिध्दीस गेल्याप्रित्यर्थ भक्तियुक्त अंतःकरणानें केलेली सद्गुरूस्तुति इत्यादि भागहि वाचकांचीं मनें आनंदींत करणारा आहे या ग्रंथाची थोरवी व फलश्रुति सांगतांना महाराज म्हणतात "येणेपरी चतुर्दश अध्याय। कथा झाली अप्रमेय। हे ज्यासी प्राप्त होय। त्रिभुवनीं धन्य तोचि ।६५। जैसा चवदा विद्यासार । चवदा भुवन थोर । चवदा रत्न सुन्दर ।

भूमिवरी । ६५ । अनंत चवदा गाठीचा । शिवमहिमा चवदा तिथींचा । ऐसें महात्म हें साचा । जाणिजे सर्वज्ञ । ६७ । या ग्रन्थाची थोरी । मुक्त होती संसारी । यदर्थी पठण करी । वारंवार आदरें । ६८ । देशिकानंद माझा गुरू । मी त्याचा दास किंकरू । मज मुखानें उच्चारू । करविला ग्रन्थाचा ।६९। ग्रन्थाचें नाम अघटित । ठेविलें देशिक लीलामृत । भवरोगियासी अमृत । जाणावे सत्यपैं । ७० । ( अ. १४ )"

प्रस्तुत ग्रन्थ शके १७९६ मध्यें श्री सदानंद महाराजांनीं उमरी येथें लिहून पूर्ण केला. ग्रन्थसमाप्ति प्रसंगीं श्री सदानंद महाराजांनीं आपल्या सद्गुरुसंबंधीं जे कृतज्ञतेचे व धन्यतानिदर्शक उद्गार भक्तियुक्त अंतःकरणानें व्यक्त केले आहेत ते सर्वतोपरी मार्मिक आहेत हें पुढील ओव्यांवरून दिसून येईल " हें सकळ तुझें स्तवन । तुझें तुज केलें अर्पण । धरिलें दोन्ही चरण । अनन्यभावें । ७६ । आतां झालों कृतकृत्य । नाहीं कोणाचें अगत्य । एक सद्गुरुचरण सत्य । धरिलें असें । ७७ । नित्य करितों भजन । अखंड श्रीपाद पूजन । दुसरें नाहीं ध्यान निज दासासी ।७८। दासानुदास तुझा । नाम पावलों सदानंद सहजा । विसीकुर सकळ निजकाजा । दासा हातीं सत्वर । ७९ । नित्यानंदा पूर्णसखया । अगाध कीर्ति केली राया । देशिकानंद गुरुवर्या । बोप म्हणे मुक्त झालो । ८२ । ( अ. १४ )"

महाराजांची भाषा अत्यंत मधूर, साधी, सुबोध व चित्ताकर्षक रसाळ व प्रसादपूर्ण आहे. भाषा जुन्या वळणाची असून माधुर्य व सुगमता हें तिचें वैशिष्ठय आहे. मुकुंदराज, ज्ञानेश्वर व व वामन पंडित यांच्या ग्रन्थांचा महाराजांचा विशेष अभ्यास होता असें दिसून येते. भाषेच्या दृष्टीनें मुकुंदराजांच्या विवेकसिंधुची छाया प्रस्तुत ग्रन्थांत विशेषं करून प्रतीत होते प्रत्येक अध्यायांतील शिवस्तवनरूप मंगलाचरणें व सद्गुरुस्तवनरूप भक्तिपूर्ण वचनें अत्यंत वाचनीय व माननीय अशीं आहेत. वेदांत जिज्ञासुकरितां ८ ते ११ अध्यायांतील अध्यात्मप्रतिपादन विशेष मौलिक आहे. तसेंच दुसऱ्या व तिसऱ्या अध्यायांतील चरित्रनायकाचा जन्म, नामकरण व विवाह इत्यादि

विविध प्रसंगाचें वर्णन करतांना महाराजांचें काव्यचातुर्य व रसाविष्करण उत्कंठतेनें प्रतीत झालें आहे. एकदरीत शुकानंदसांप्रदायिक भक्तमंडळींत आणि विशेषतः उमरीकर महाराजांच्या शिष्यपरंपरेंत प्रस्तुत ग्रन्थ नित्य पूजन व पठण या दृष्टीनें सर्वमान्य ठरेल यांत संशय नाहीं. केवळ संतचरित्र या दृष्टिनेंहि पाहतां प्रस्तुत दैनिक लीलामृत ग्रन्थ अत्यंत सरस व प्रसादपूर्ण वठला असल्यामुळें संतप्रेमी रसिक व भाविक भक्त यांनींहि तो वाचन व मनन करण्याच्या योग्यतेचा आहे एवढें सांगितलें म्हणजे पुरें.

नांदेड विभागांतील अज्ञात संतकवींचीं चरित्रें व काव्यें यांचें संशोधन चालू असतांना श्री शुकानंदसांप्रदायिक संतकवींचीं चरित्रें व काव्यें विशेष प्रमाणांत उपलब्ध झालीं. हें जाणून श्री अमृतराव महाराज उमरीकर यांनीं श्री शुकानंद महाराजांच्या पट्टशिष्यशाखेचा इतिहास लिहिण्यास आम्हास प्रेमानें पाचारण केलें व त्याप्रमाणें "उमरी मठांतील संशोधन" या लेखमालेंतून तें कार्य यथामति पार पाडलें. प्रस्तुत "ग्रन्थपरिचय" लिहिण्यासहि त्यांचीच आज्ञा कारणीभूत झाली. श्री सदानंद महाराजांसारख्या थोर सत्पुरुषांच्या ग्रन्थास दोन शब्द लिहिणें हें आमच्या योग्यतेच्या व पात्रतेच्या बाहेर असल्याची तीव्र जाणीव झाली. परन्तु "वेडें वांकुडें गाईन। परि तुम्हा म्हणविन।" ही भावना व श्री अमृतराव महाराजांचा आमच्यावरील लोभ या दोन गोष्टी ध्यानीं धरून ग्रंथपरिचय लिहिण्यास धजावलों. या परिचयात्मक दोन शब्दांनीं प्रस्तुत लीलामृताची माधुरी सेवन करण्याकडे जरी वाचकवर्गाचीं मनें आकृष्ट झालीं, तरीहि या प्रयत्नाचें अंशतः चीज झालें एवढेंच लेखकास समाधान वाटेल.

नांदेड
आश्विन व. १२ शके १८५९

विश्वेश्वर अंबादास कानोले

श्री ब्रह्मीभूत सदानंद महाराज उर्फ
श्री बाबामहाराज उमरीकर



जन्म शके १७६०　　　　समाधि शके १८४६

श्री

# श्री देशिक लीलामृत

## प्रारंभः ॥

श्रीगणेशायनमः । श्रीसरस्वत्यैनमः । श्रीगुरुभ्योनमः । श्रीभवानी शंकरायैनमः । श्लोक । श्रीगुरु देशिकानन्द शुकानन्द गुरोःपरं । उमापत्यं परमेष्टिमहं वंदे गुरुत्रयं ॥ १ ॥ नमो श्री गजानना । सिध्दि बुध्दि प्रिय रमना । मति द्यावी ग्रन्थ रचना । या कारणं नमस्कार ॥१॥ आतां नमू सरस्वती । आदिमाया ब्रह्मशक्ती । वाग्देवी बुध्दिदाती । म्हणोनिया आदरें ॥२॥ जयजयाजी गुरुराया । दीनबंधू पूर्ण सदया । माते कृपा करोनिया । पाहावे आजी ॥३॥ महादेवा त्र्यंबकेशा । गौरीरमणा परमपुरुषा । नंदी वाहना अनादीशा । तव कारणे नमन माझे ॥४॥ सकळ जन श्रोतीयासी । प्रार्थना करितां साचेसी । मज कारणें ग्रन्थासी । आश्रयो व्हावा ॥५॥ तुमचा होईल आश्रयो मज । इच्छिले कार्य निपजे सहज । न्यूनता कधीं न पडे काज । उगवती आनायासे ॥६॥ वक्ता करी बहू कथन । परी श्रोतियाचें न स्थिरे मन । तरी काय होईल अनुसंधान । प्रगट या ग्रन्थाचे ॥७॥ श्रोता होइजे पूण चन्द्र । देखोनिया वक्ता समुद्र । भरते येती आरद्र । जेवी चन्द्रकांती ॥८॥ काय समुद्राचे चाडे । पूर्ण चन्द्र होतसे पुडे । तो दावी आपुले पवाडे । पहुडपणाचे ॥९॥ तैसे तुमचे श्रोतेपण । कासिया वक्ता करिल स्तवन । जी आपुली थोरपणा । प्रगट होती स्वभावें ॥१०॥ ऐसे निष्ठूर माझे बोला । मनीं न

धरावाजी अबोला। दुसनी मारिती धेनूला । वत्स जेवी ॥११॥ जव जव लागता दुसनी। तव तव दुग्ध उतरे स्तनीं। वाकुडे बोलतां श्रवणीं। पाजविती प्रेमरस ॥१२॥ असो आतां बहु बोलण। करुनी एकाग्र मन। जे जे मी करीन कथन। श्रवण करा प्रीतीनें ॥१३॥ जयजयाजी आनंद कंदा। पूण ब्रह्म पूर्णा नन्दा। सच्चितानन्द गोविंदा। परात्परा तूं एक ॥१४॥ तूं निराकार निगुर्ण। निराभास निरंजन। विकार रहित परिपूर्ण। अखंडित असशी ॥१५॥ अचिताद्व्यापरमिता। निःसंग निर्मळ अनंता। परम पुरुषा भेदातीता। अचलामरा तूं ॥१६॥ सर्व व्यापका सर्वोध्दारा। सर्वांतरा पूर्ण प्रियकरा। नित्यानन्द निर्विकारा। पार नसे स्वरुपाचा ॥१७॥ तुझें स्वरूप वर्णावयाचें। सामर्थ्य नसे कोण्हाचे। वेद नेणती म्हणोनी वाचे। नेती नेती बोलले ॥१८॥ वेदाचि मति कुंठित। मी काय वर्णुं पामरतुत। जरी होशील कृपावंत। देवाधि देवा ॥१९॥ देशिकानन्द सद्गुरु। मूर्तिमंत पूर्ण ईश्वरु। माझे हृदयीं संचारु। करी ग्रन्थ रचनेसी ॥२०॥ या ग्रन्थाचें नाम देशिक लीलामृत। लीला चरित्र झाले जे समस्त। तयाचें अनुष्टुप करितो लिखित। श्रवण करा आदरे ॥२१॥ गोदावरी दक्षिण तीरे। भरतखण्ड जम्बुद्वीप साजिरे। दण्डकारण्य अतिघोरे। अंतनाही वनाचा ॥२२॥ त्या वनामाजी क्षेत्र। आंबापूर नाम पवित्र। तेथील महिमा विचित्र। योगेश्वरी देवीचा ॥२३॥ तिचा प्रताप बहुत। जीवे मारिलासे दैत्य। दंतासुर नाम विख्यात। श्रुत असे सर्वांसी ॥२४॥ तिच्या भोंवताली दैवत। प्रगट आणि बहुगुप्त। न गणवे असंख्यात। पार नसे महिमेचा ॥२५॥ पुण्य क्षेत्र पुण्य भूमी। पाहोनिया मनोरमी। ग्रह स्थाविलें तेंचि ग्रामीं। उध्दवाचें वंशिस्थ ॥२६॥ मूळ कृष्णाजीपंत। तयाचे चिमाजी सुत। महा पुरुषार्थी अद्भुत। न वर्णवे कोण्हासी ॥२७॥ तयापासुनी गदाधर। परम पवित्र अति चतुर। अवतरला सारंगधर। जेवी दुसरा ॥२८॥

सर्व विद्या संपूर्ण । ज्योतिषाचे प्रत्यक्ष ज्ञान । सिध्दांताचे सागर पूर्ण । उठती लहरी वैखरीसी ॥२९॥ मग ग्रामवासी नरनारी । कल्पोनि कांहीं कार्य अंतरीं । प्रसन्न करावया घरीं । येताती सप्रेमे ॥३०॥ जे जे प्रश्न करिती त्यासी । सिध्द गणितार्थ निष्चयेसी । उत्तर देती बहु सरसी । न्यून नसे अनुमात्र ॥३१॥ सत्यज्ञान पाहूनि वार्ता । प्रगटली परग्रामी समस्ता । धावोनी येती ज्या अर्था । अर्थ पुरविती तयाचे ॥३२॥ स्नान संध्या देवार्चन । अखंड जयाचे अनुष्ठान । सदा सप्रेम शिव भजन । करिताते नेमेसी ॥३३॥ नित्य आल्या आतिथासी । अन्नदान करिती त्यासी । सदा शांत नये मनासी । विषमता कदाही ॥३४॥ तव एके काळीं अकस्मात । नबाब निघाला देश पहात । दरकुच मुकाम करित । स्वारी आली आंब्यासी ॥३५॥ उतरूनी ग्रामा बाहेर । डेरे दिधले कनातीसीर । फौजेचा भोंवती भार । राहिला असे ॥३६॥ दुसरे दिवशीं दरबार । भरविला येउनी सरदार । जमीदारहीं थोर थोर । दर्शनालागीं पातले ॥३७॥ त्या समुदायामाजी । अर्ज करिती आपुले काजी । सत्य कार्य होता राजी । प्रेमयुक्त अनायासे ॥३८॥ प्रधानासी पाचारण । सवेंचि केले राजीयान । ग्रामांतील काय वर्तमान । नवल विशेष वर्तले ॥३९॥ जे जे तुज झाले श्रुत । ते ते कथन करावे समस्त । ऐकूनीया प्रभुची मात । बोलता झाला मंत्री ॥४०॥ ग्रामवासी एक ब्राह्मण । गदाधर असे नामाभिधान । सिध्दांत ज्योतष्य अति गहन । पूर्ण असे तयास ॥४१॥ वाणिद्वारा वर्ण निघती । ते कदापि असत्य न होती । बहू दूरवर प्रगट ख्याती । सत्य असे तयाची ॥४२॥ राजा संतोषोनी अंतरीं । प्रधानासी आज्ञा करी । ब्राह्मणाते आणोनी समोरी । परीक्षा पाहावी ॥४३॥ मग प्रधान उठोनी । बाहेर आला ततक्षणीं । चोबदारासी पाचारुनी । सांगता झाला ॥४४॥ एक अश्वासमवेत । तुम्ही जावे हो ग्रामात । गदाधराख्य ज्याची मात । सत्वर त्यासी आणावे ॥४५॥ आज्ञा वंदूनिया शिरीं । प्रवेशला ग्रामा भीतरी । येवोनिया तयाचे द्वारीं । कळविली राजाज्ञा ॥४६॥ हे महाराज दयानिधी । तुम्ही जाणता सर्व विधी । राजा प्रधान वंदूनि आधीं । पाचारिले तुम्हांते ॥४७॥ ऐकूनी सेवकाचे बोला ।

आपुला नित्यनेम सारिला । स्वारी निघाली भेटीला । राजसभे सत्वरीं ॥४८॥ प्रवेश होता सभेंत । प्रधनादि समस्त । राजा उठोनि अलिंगीत । पंडितो सप्रेमे ॥४८॥ पाहता वदनाची आकृती । केवळ भानु प्रकाशदीप्ति । तेज न वर्णवे मती । मुग्धता पावे ॥५०॥ ऐसी दिव्य मूर्ती पाहुनी । राजा विनवी कर जोडोनी । म्हणें महाराज माझे मनी । प्रश्न करावा वाटतो ॥५१॥ तुम्ही सर्व गुण संपन्न । ज्योतिष्याचे प्रत्यक्ष ज्ञान । जे बोलाल ते वचन । असत्य नोहे कदापि ॥५२॥ ही आम्हा कळली ख्याती । म्हणोनि पाचारले तुम्हाप्रति । कांहीं प्रश्न करावा मति । इच्छा झाली असे ॥५३॥ विप्रेन्द्र वदे रायाशी । तुमची इच्छा असेल मानसी । तो प्रश्न करावा आम्हासी । याच वेळीं सत्वर ॥५४॥ तव आपली प्रिय गुणी । समागमे एक अश्विनी । ती आहे पूर्ण गर्भिणी । प्रसूतीकाळ समीप आला ॥५५॥ तिचेंच पुसावे लक्षण । केले अंतरी चिंतन । प्रधानास आज्ञा करून । सन्मुख तोसो आणिले ॥५६॥ राजा म्हणें विप्रेंद्रा । ज्ञानवना पूर्णचंद्रा । जेवी अंत नाहीं समुद्रा । तैसे तुम्ही समर्थ जी ॥५७॥ आतां ऐकावे माझे वचन । ही तुरंगनी आहे गर्भिण प्रसूतिकाळ कोणता दिन । येईल तो सांगावा ॥५८॥ तिथीवार नक्षत्र घटिका शुभापवित्र । कन्या होईल कीं पुत्र । कोणते रंगाचे ॥५९॥ सर्व लक्षणीं ज्यातक । सांगा आम्हासी कौतुक । तव गणित करूनि सम्यक । बोलताती यथाक्रमे ।६०। आजपासून तिसरे दिवसी । दोन प्रहर भरता निसी । प्रसूत होईल ते समयासी । प्रजन्य यईल किंचित ॥६१॥ पुत्र होईल सर्वांग निळे । कपाळी शुभ नेत्र गारोळे । श्वेत चार पादकमळे । रक्तवर्ण पुच्छासी ॥६२॥ जे जे लक्षण गणिताचे । सर्व सांगती निज वाचे । प्रधानाने केले त्याचे । स्वहस्ते टिपण ॥६३॥ जातक कथिले संपूर्ण । तव झाला सूर्य अस्तमान । राजा विनवी विप्रेन्द्र लागुन । जावे आतां गृहासी ॥६४॥ वचन मानुनी सत्वर । घरूं प्रधानाने कर । बैसविले अश्वावर । आनन्दयुक्त मानसी ॥६५॥ देवोन चोपदार संगे । ग्रहासी पावले अतिवेगे । प्रविष्ठ केलेली वार्ता सांगे येवोनिया प्रभुसी ॥६६॥ दरबार झाला निवांत । राजा गेला अंतःपुरात

सभाजन आपापल्या स्थानांत । पावते झाले ॥६७॥ दुसरे दिवशीं प्रातःकाळीं । राजदर्शना येति शेळी । प्रधानासहित सेनामंडळि । धावताती त्वरेने ॥६८॥ प्रभु म्हणे प्रधानाते । तुम्ही आज्ञा करा सेवकाते । कि उत्तम रक्षावे समस्ते । अश्विनिसी सत्यपै ॥६९॥ तिचा प्रसूतिकाळ समिप । आला असे पूर्णरूप । म्हणोनि कोणहाचा ताप । लागू नये तिजसी ॥७०॥ आज्ञा स्वीकारूनि प्रधान । सेवका सांगे वर्तमान । तुरंगनीवरी डेरा देउन । संरक्षण करावे ॥७१॥ डेरा देवोनी कनाति । भोंवती लाविल्या निगुती । सेवक रक्षण करिती । दिनजिसी बहुत ॥७२॥ तव तिसरा दिवस तिचा । प्राप्त झाला प्रसूतीचा । जिसी दोन प्रहराची साचा । भरली असे ते काळीं ॥७३॥ अभ्र नसता अकस्मात । प्रजन्य आलासे किंचित । काळ भरता प्रसूत । झाली असे अश्विनी ॥७४॥ वार्ता कळविली प्रभूसी । जी मध्यकाळ भरता जिसी । प्रसूत झाली निश्चयेसी । पुत्र झाला सत्य असे ॥७५॥ राजा उठोनि ते वेळी । संगे प्रधान बहु मेळी । सत्वर पंखिनी जवळी । चमत्कार पाहू आला ॥७६॥ गणितार्थ लिहिले लक्षण । प्रधान पत्रिका हातीं घेऊन । नृपा सन्मुख कर जोडोन । वाचिता झाला ॥७७॥ मग जे जे लक्षण लिखित । ते ते पाहिले समस्त । कांहीं त्यामाजी किंचित । न्यूनता दिसेना ॥७८॥ आनंदयुक्त राजा अंतरीं । प्रधानासहित आश्चर्य करी । म्हणती काय विधेची थोरी । बोलता वाचे न येते ॥७९॥ ईश्वराधीन ज्या गोष्टी । ब्रह्मदेव करितसे सृष्टी । कर्मांलिखित प्रत्यक्ष दृष्टी । सत्य पाहिले आम्हाचे ॥८०॥ विप्रेंद्र गुणा काय वर्णावे । प्रत्यक्ष ईश्वरचि जाणावे । ऐसे म्हणोनि भक्तिभावें । पातले निजस्थाना ॥८१॥ इकडे नित्यानित्य विप्रेंद्र । नेम सारिती सुपवित्र । अखंड जपती नाममंत्र । सद्गुरु देवाचे ॥८२॥ भानूचा होता उदयकाळ । सेवक दर्शना आले सकळ । पाचारण करी भूपाल । प्रधानासी ते काळी ॥८३॥ जी जी म्हणोनी सारथी । बध्दां जुळी करोनी प्रार्थी । पाचारिले कोणे अर्थी । निवेदन करावे ॥८४॥ तव म्हणे द्विजेंद्राप्रती । घेऊनि यावे स्वये युक्ति । दर्शनाची बहु प्रीति । मज अंतरी वाटतसे ॥८५॥ श्रवण करूनि प्रधान । सत्वर ऊठला आपण ।

संगे सेवकाते घेउन । निघता झाला ॥८६॥ सेवकाचे भार पुढें धावती। विप्रेंद्रा सदनी वार्ता सांगतो । जी बोलाऊ आले तुम्हाप्रति । सारथ्य कर्ते प्रभुचे ॥८७॥ ऐकोनीं सेवकाची वाणी । सावध झाले विप्रेंद्र सदनी । प्रधान मंदिरांत येवोनी । वंदन करी द्विजोत्तमा ॥८८॥ विप्रेंद्र करोनी आशिर्वचन । म्हणती कोण्या अर्थी केले येण । तव म्हणें तुम्हा लागुन । स्मरण केले राउळे ॥८९॥ जी राजाज्ञा आम्हा ऐसी । पाचारावे आपणासी । विलंब न लागता वेगेसी । आणावे द्विजोत्तमा ॥९०॥ प्रभु वचनाचे अक्षर । स्वीकारून मस्तकावर । स्वये निघालोजी सत्वर । सेवकासहित ॥९१॥ आता चला हो महाराज । पुण्यप्रतापा पूर्ण सतेजा । मार्ग क्रमीत असेल राजा । निज दर्शना कारणें ॥९२॥ वचन धरोनी श्रवणी । गदाधर उठले तत्क्षणी । निघाले स्वार होऊनी । भुपती दर्शनाते ॥९३॥ प्रधान सेवकासहित । मार्ग चालती आनंदयुक्त । विप्रेंद्राप्रति वनोद करीत । राजसभे पातले ॥९४॥ प्रवेश होता सभेत । देखोनि उठले नृपनाथ । महाराजाचे धरोनी हस्त । बैसविले निजासनी ॥९५॥ प्रेमभरित अंतर । मस्तक ठेवी चरणावर । जी कृपेचा पूर्ण कर । व्हावा मजवरी ।९६। मी अज्ञानी बहू अधम । कोणते कर्माचा नसे गम । नेणोनि तुम्हा परम । श्रमविले सत्य पैं ॥९७॥ हरिहर चतुरानन । त्रिदेवता सृष्टीसी कारण । त्याचा आवतार पूर्ण आपण । घेतलासे जगदोध्दारा ॥९८॥ आनंद कल्पाण आनंद मूर्ति । अखंड ध्यानी ब्रह्मस्थिती । गुण वर्णावया त्रिजगती । सामर्थ्य नसे कोण्हाचे ॥९९॥ सुकृतांश पूर्वीचा कांहीं । तो उदयासी आला पाही । म्हणोनि लाभ जोडला देही । तुमचे दर्शनाचा ॥१००॥ चरणस्पर्श होता प्राणी । मुक्त होती तत्क्षणी । सर्व पापराशी जळोनी । भस्म होती निश्चये ॥१॥ नाम स्मरोनि कार्य करिता । सिध्दी पावे अविघ्नता । महाकाळ भय करिता । अभयकर होतसे ॥२॥ अनुदिनी करिता ध्यान । नाश घडे समूळ अज्ञान । बुध्दि पावे ज्ञान कल्याण । आपुल्या प्रसादे ॥३॥ असो पूर्वी गणित । अश्वाचे केले निर्मित । वचनासारखे समस्त । प्रत्ययासी आले ॥४॥ जी आपुली सुप्रसन्न वाणी । मान्य केली चतुराननी । त्यांत कोण करील हानी । वाक्य

असे विधीचे ||५|| संगोयोनी नृपनाथे | आज्ञा केली प्रधानाते | एक दुशाला पांचशते | रुपय आणा वेगेसी ||६|| आणखी चार आणे योमिया | सनद द्यावी करुनिया | वंशपरंपरा मिळावया | विक्षेपता येऊ नये ||७|| सनद लिहूनी सत्वरी | राजमोहर केला त्यावरी | ठेवोनी तबका भीतरी | रुपया समवेत ||८|| प्रेमभरीत दुशाला | द्विजोत्तमासी वोढिला | दक्षणासह सनदिला | समर्पण केले ||९|| धरोनी दोन्ही चरण | करिता झाला नमन | तव कृपा वरदान | दीधले प्रभूनी ||१०|| सुखी राहावे वर्षे शत | धन धान्य दारा सुत | राज्य अधिकोत्तर वृधिंगत | सदा पावेल ||११|| संपादोनी आशिर्वचन | उभा राहिला कर जोडोन | म्हणे मी अनाथ दीन | कृपा करावी मजवरी ||१२|| मी दुष्ट महा दुर्गुणी | शुभाशुभ नेणे करणी | अपराध क्षमा करोनी | तारावे आम्हाते ||१३|| तुम्हा केले बहु श्रमित | खेद वाटे अंतरात | क्षणक्षणा अलंगीत | अश्रु धाहे नेत्रासी ||१४|| आतां केव्हां होईल भेटी | नृप कंठीं दाटली मिठी | विप्रेंद्र धरोनिया पोटी | समाधान पै केले ||१५|| खेद करू नये नृपनाथा | भेद न धरावा जी सर्वथा | शरीर भिन्न एकात्मता | जाणावी सर्वस्वी ||१६|| राजा होवोनी समाधान | सन्मुख उभा असे प्रधान | त्यासी जवळ पाचारून | बोलता झाला ||१७|| सैना करावी तयार | वाद्य नादादि समग्र | मार्गस्थ करावे विप्रेंद्र | निज सदना कारणे ||१८|| बाहेर येऊनिया मंत्री | सैना सिध्द केली सर्वत्री | डंका चौघडे वाजंत्री | आणीक बहुत ||१९|| विप्रेंद्र आणि भुपति | उठले सभाजन समस्ती | वाद्यनाद बहु गर्जती | दाटीं झाली सैनाची ||२०|| सिध्द करुनि अंबारी | अलंकार घातले गजावरी | आरोहुन राजा विप्रेंद्र मंत्री | करिते झाले ||२१|| बैसोन निघाले सत्वर | वाद्य वाजती मनोहर | मागे पुढें सैन्याचा भार | ग्रामात प्रवेशले ||२२|| ग्रामवासी नारी नर | पाहू येताती समग्र | सिरघूनी सारे नगर | विप्रेंद्र सदनीं पावले ||२३|| द्विजेंद्र खाली उतरत्या वेळीं | नृपाने जोडिलीं करांगुळी | मंत्रीसह सैना मंडळी | वंदन केले सर्वांनीं ||२४|| अशिर्वचन समस्तात | करून गेले अंतःपुरात | सैना समवेत नृपनाथ | निजस्थाना पावले ||२५|| द्वादश

दिवस पर्यंत । नृपे केला वास तेथ । मग सेना समवेत । निघता झाला ॥२६॥ पश्चिमेस दोन योजन । धारुर क्षेत्र असे पुरातन । तेथें दुर्ग महा दारुण । अंत नसे रचनेचा ॥२७॥ त्या किल्यामाजी प्रवेशले । आप आपल्या स्थाना गेले । सुखी वास करू लागले । तेचि ग्रामीं सर्वत्र ॥२८॥ ईकडे विप्रोत्तम बहु प्रीती । नित्यानित्य नेम सारिती । ग्रामाधिकारी जन येती । दर्शना कारणें ॥२९॥ धर्माद्राव कोणी कांही । समर्पिती आणोनी ठायी । पाटील पांडे देसाई । मिळोनिया अवघे ॥३०॥ घरी संपत्ति अद्भुत । परी नाही पोटी सुत । कन्या होत्या समस्त । पुत्र नसे एकही ॥३१॥ तव पाहिले गणित करून । एक पुत्र आपणा लागुन । होईल तो त्रिभुवनी । कीर्ति त्याची न समाये ॥३२॥ समजोनी आपले अंतरी । आनंदयुक्त वास करी । काम क्रोध शोक द्वारी । न येती कदापि ॥३३॥ ऐसे झालेजी चरित्र । लीला विनोद बहु विचित्र । साग्र कथिता सिंधुपात्र । आगळे होईल ॥३४॥ या कारणें अनुरूप कथा । स्मरोनि देशिकानन्दनाथा । शेष म्हणे ठेवितो माथा । ग्रन्थार्थी आदरे ॥३५॥ इतीश्री देशिक लीलामृत । पुराण नाहीं कोणते संमत । सूतकथा सज्जन परिस्फोत । प्रथमोध्याय गोड हा ॥१३६॥

---

# अध्याय दुसरा

श्रीगणेशायनमः । श्रीगुरुभ्योनमः । जय जय शंभो उमानाथा । सुखघना अनाथनाथा । पुरविशी इच्छिले अर्था । गुणातीता गुणनिधी ॥१॥ नीलग्रीवा गंगाधरा । मदनांतक मनोहरा । ताटिकारी प्रियकरा । दीनबंधू दयानिधे ॥२॥ व्याघ्रांबरा स्मशानवासा । भालनेत्रा फणींद्रभूषा । चंद्रशेखरा भवपाशा । तोडिसी क्षणमात्रे ॥३॥ विश्वंभरा । विश्वाधारा । त्रिलोचना त्रितापहारा । पंचवदना परमेश्वरा । आदिमूर्ति

जगद्गुरू ॥४॥ अनंत रूपा अनंत नामा । अनंत कीर्ती अनंत धामा । अनंत सुखा अनंत धर्मा । पार नाहीं गुणाचा ॥५॥ अचिंत म्हणावें तरी व्यक्ति । निर्गुण कल्पिता प्रकृत्ति । स्वभाव अंगी ऊठती । कालभेदें करोनिया ॥६॥ निर्गुण निरामय निःसंगा। निर्व्यय निराकार निर्भोगा। दयाघंता भवरोगा । नाश करी कृपामृतें ॥७॥ जन्म मरणाचे कोडी । भोगिती जीव बापुडी । त्याचे फेडावया उडी । घालिसी देवाधि देवा ।८। संसारामाजी फिरता । कष्ट होती जी अनंता । दुःख दूर करूनि दाता । सुखाचा तू एक ॥९॥ म्हणोनि अनन्य भावें । सद्गुरूसी शरण रिघावें । देही ब्रह्मत्व पावावें । प्रसादें जयाचेनि ॥१०॥ गुरुप्रसाद ज्याचे शिरी । तो त्रिभुवनाचे राज्य करी । कोणत्या कर्माची उरी । न ठेवी कदाही ॥११॥ गुरूचा आश्रय ज्याने केला। तो जिताची मुक्ति पावला। ब्रह्मादि धंदिती त्याला । आदरें करुनी ।१२। या कारणे गुरु भक्ति। अखंड साधावी निश्चिती । स्वभावें निरसन होती । जन्म मरण जीवाचें ॥१३॥ पूर्व कर्माचेनि भरें । जीव देही संचरे । नाना योनी फिरे । विषय भोगीत ॥१४॥ या कारणे सद्गुरूसी । अखंड भजावें मानसी । ठाकोनि विषय भोगसी । जीवन्मुक्त होय साच ॥१५॥ पूर्वाध्यायीं अनुसंधान । निरूपिले जे सुलक्षण । आता पुढे करितो कथन । श्रवण करा प्रीतीने ॥१६॥ गदाधर महा मूर्ती। मार्ग चालती धर्मनीती। वर्णन करिता माझी मती। कुंठता पावे ॥१७। एक पत्नी असे वृत्त । एक वचनी विरक्त । एकनिष्ठा आनंदयुक्त। राहती सर्वदा ।१८। प्रसूत नारी न होती। पृष्ठ मोरिसी भिजविती । नेवोनी उदक प्राशना देती । प्रसुत होती तात्काळ ॥१९॥ ऐसें सामर्थ्य तपाचें । काय वर्णु मी मूढवाचे । परी कृपाफळें त्याचें । ऊमटती वाणीसी ॥२०॥ जैसी विण्याची तार । पूर्वी असते मंद फार । झारा लाविता नाद थोर । उठतो विण्यासी ॥२१॥ तैसा कृपेचा झारा । लावूनि माझे मूखी तारा । नाद प्रगटवी बरा । बोलवीजे स्वभावें ।२२। असो एक संवत्सर भरता। साळूबाई निजकांता। अति लावण्य पतिव्रता। गरोदर राहिली ॥२३॥ गर्भ राहूनि उदरी । मास मास वृध्दि करी । डोहळे होती अंतरी । तया गर्भिनीतें ॥२४॥ नवमास नव दिन । गर्भ

वाढला संपूर्ण । प्रसूती काळ येता जाण । सिध्द केले साहित्य ॥२५॥ सोमवार सायंकाळी । प्रदोष पूजा चंद्र मौळी । दीपोत्सव होते वेळी । प्रसूती झाली ॥२६॥ पुत्र झाला शुभानन । बत्तिस लक्षणी संपन्न । शिवस्वरूप अति गहन । दिव्य प्रभा फाकली ॥२७॥ पुत्र झालेली वार्ता । ग्रामी प्रगटली समस्ता । आनंद येती नर कांता । पाहावया कारणे ॥२८॥ वाद्य नाद गर्जती अपार । घेऊनि येती पुष्पांचे हार । शर्करा वाटिली मनोहर । घरोघर लोकांसी ॥२९॥ प्रेमभरित जनिता । ग्रही असे बहू संपता । धर्म करिती आलिया अतिथा । आनंदयुक्त सर्वांसी ॥३०॥ जन्मकाळी बाळकाचे । जातक पाहती गणित साचे । कथन करिती निज वाचे । नक्षत्र राशी वरूनी ॥३१॥ पंधरा वर्षपर्यंत । विद्या ग्रहण करील समस्त । मग वैराग्य येईल त्यात । सोडील ग्रह दारासी ॥३२॥ भेटेल एक सत्पुरुष । धरील त्याचा सहवास । पुढे पाच वर्ष । वास करील वनासी ॥३३॥ त्यागुनी आहार अन्नाचा । भक्षील पाला वृक्षाचा । थारा नसे मनुष्याचा । त्या स्थळी राहील हा ॥३४॥ भयानक अरण्यात । एक वेळ प्राणांत । शरीर होईल शीत । क्षीणता पावे ॥३५॥ उचलोनी ग्रामाभीतरी । आणितील शेतकरी । तथोनि अन्नरस उदरी । घालितील ब्राह्मण ॥३६॥ स्वस्थ होऊनी प्रकृती । देश पहावया निघती । मार्गी प्राप्त होईल अवधुती । महा भक्त प्रतापी ॥३७॥ याणीद्वारा भगवत्कीर्ती । प्रगट होईल असंख्याती । पुढील श्रवणी जन्मोती । प्राप्त होती तरावया ॥३८॥ शहरामाजी प्रवेश । राजा होईल वश । सकळ जनांसी संतोष । अनुसरतील सेवेला ॥३९॥ संतती संपत्ति बहूत । गुरु प्रसादे होईल प्राप्त । अष्टांग योग समस्त । साधती तयासी ॥४०॥ आयुष्य वर्ष शंभर । आरोग्य राहील शरीर । इंद्रियादि समग्र । सानुकूळ राहती ॥४१॥ सहस्र वर्षानंतर । श्रेष्ठ इंद्रिय सोडील शरीर । रूप दिप-याचे प्रकार । न कळति तयासी ॥४२॥ प्रतिकूळ एक इंद्रियान । सर्व कार्य पराधीन । होईल निरवसान । विनाशकाल येईल ॥४३॥ परी कोणत्या गोष्टीची । न पडे न्यूनता त्याची । इच्छिले त्या अर्थाची । पुरवयता पावेल ॥४४॥ या प्रकारे जन्मपत्रिका । गणितार्थ प्रगट केली देखा

कथन करूनि सकलिका । स्थीरता झाला ॥४५॥ एक रूप नित्यानित्य । गजर होतसे आनंदयुक्त । द्वादश दिवसपर्यंत । महानंद वर्तला ॥४६॥ मग बारावे दिवशी । नाम ठेवावे बाळकासी । म्हणोनी सर्व ब्राह्मणासी । आमंत्रण दिधले ॥४७॥ भोजन करूनि ब्राह्मण । तांबूल दक्षणा घेऊन । मंत्राक्षता देऊन । निजसदना निघाले ॥४८॥ सायंकाळचे वेळी । मिळाली स्त्रिया मंडळी । बाळंतविड करकमळी । समर्पिती आणोनिया ॥४९॥ साखळदंड पाळणी । लावोनी वरी खेळणी । नाना वस्त्र आसनी । घालती सत्वर ।५०॥ नानाप्रकारचे अलंकार । घातले सर्वांगावर । वस्त्राचे बहू भार । अनेकापरी रंगाचे ॥५१॥ निजवोनी बाळकाप्रती । आनंद वाटे सर्वांचे चित्ती । शरीर नारी अवलोकिती । धरोनिया पोटासी ॥५२॥ मस्तकाची आकृती । केवळ पिंडी पशुपति । शिव शिव म्हणोनि चिंतीती । हृदयामाजी सकळ ॥५३॥ जैसा महाभक्त सोनार । पंढरी माजी त्याचे घर । नामाभिदान नरहर । जाणावे सत्य पै ॥५४॥ शिवावाचूनि दैवत । दुसरे नाही पूजित । एकनिष्ठा एकचित्त । चालवितो सप्रेमे ।५५। तव नृपाचा होता नवस । कटिसूत्र अर्पावे देवास । फेडावया संकल्पास । प्रवर्तक झाला ॥५६॥ येवोनिया क्षेत्रासी । वार्ता पुसे पुजारियासी । अति चतुर ग्रामवासी । कोण आहे सोनार ॥५७॥ त्याने सांगितले नरहरी । अलंकार करी बहुपरी । त्याज वाचोनि अन्य पुरी । कोणी नसे चतुर ॥५८॥ ऐकोनि निघाला वेगेसी । येवोनि तयाचे ग्रहासी । म्हणे आमचा नवस देवासि । कटिसूत्र बांधावे ॥५९॥ ऐकोनि राजवचना । हात जोडोनि करी प्रार्थना । जी सुत्र बेत पाहूनि आणा । तदनुसार करीन मी ।६०। बेत आणिला सत्वर । सिध्द केले कटिसुत्र । जडित कोंदन समग्र । नानापरि लाविले ॥६१॥ स्वहस्ते देवाप्रती । कटिसुत्र बांधी नृपती । तव द्विअंगुळ कमति । आले असे ते काळी ॥६२॥ राजा वदे आज्ञाधारा । पाचारावे सोनारा । पुजारी म्हणती नेम पुरा । तो न ये कदापि ।६३। एकनिष्ठ देवासी । भजत आहे शिवासी । त्या वाचोनि अन्यासी । न पाहे दृष्टीने ।६४। तव राजा उठोनी वेगेसी । आला सत्वर तयापासी । चलावे म्हणे राउळासी । कटिसुत्र बांधावया ।६५। सोनार

म्हणे नृपनाथा । मी पूजितो उमानाथा । शिवा वाचोनि अन्यथा । दैवतासी न पाहे ॥६६॥ तव म्हणें माझे साठी । बांधावी स्वयें दृष्टी । सूत्र लावूनी कटीं । निजसदना यावे ॥६७॥ तव येवोनि राउळाते । बध्द केले दृष्टीते । करी घेवोनी सूत्राते । बांधिता झाला ॥६८॥ उभा असे भगवंत । कटीवरी ठेवोनी हात । सूत्र बांधिता किंचित । कमी न देवासी ॥६९॥ आनंदयुक्त राजा अंतरी । म्हणें काय सांगावी थोरी । महाभक्त नरहरी । सोनार जातीचा ॥७०॥ जातीवर्ण नसे देवासी । प्रसन्न होतो भक्तासी । जाणोनिया निज मानसी । पूजा केली संपूर्ण ॥७१॥ बध्द नेत्री पंढरीनाथा । शरीर चापचीत चालला माथा । तव पींडी लागली हाता । महेश्वराची ते काळी ॥७२॥ उघडोनि नेत्रासी । पाहिले हरीहरासी । दृढ लागला चरणासी । भेद रहित स्वानंदे ॥७३॥ या प्रकारे भक्त कोणी । होतील शिवाचे अभिमानी । म्हणोनि स्वयें धूर्जटी । प्रगट केले पिंडीते ॥७४॥ चंद्रवदन कमल नेत्र । सरळ नासिका विस्तीर्ण श्रोत्र । वर्ण सावळा पवित्र । हास्य वदन सर्वदा ॥७५॥ भाळी लाविले पिंपळ पान । बाळयाने भरलासे कान । गळासरी शोभायमान । वाघनखे आणिक ॥७६॥ जडित मोत्याची कंठी । लागली पदकाची दाटी । दंडी वाक्या मनगटी । बिंदल्या समवेत ॥७७॥ कटि गोफाचे घातिले सूत्र । वाळे साखळ्या पाइ पवित्र । अंगी लेथिले वस्त्र । बहुपरी रंगाचे ॥७८॥ सर्व पाहूनि शरीराकृती । अवतार प्रगट झाला म्हणती । रमाकांत उमापती । मूर्तीमंत दीसतो ॥७९॥ पाळण्यात निजवोनि बाळा । नाम ठेविती वेल्हाळा । बाळकृष्ण म्हणोनि आरोळा । मारताती सर्वत्र ॥८०॥ नानापरी पाळणे गाती । सूत्र धरोनीया हालविती । तांबूल सुपारी वाटिती । वाद्यनादे करोनियां ॥८१॥ नाम ठेवोनी सर्व नारी । आनंदयुक्त बहु अंतरी । गेली आपुलाल्या मंदिरी । बोलताती विनोदे ॥८२॥ इकडे बहु दिवसा आपणाते । पुत्र झाला म्हणोनि त्याते । माता पिता घेवोनि हस्ते । आलिंगिती प्रेमरसी ॥८३॥ मास मासा वाढते । बाळ करांगुळागते । खुळखुळा वाजविते । निज हस्ते धरोनिया ॥८४॥ पंच वर्षांचा झाला बाळ । मिळवोनि पोर सकळ । नाना प्रकारचे खेळ । करिता झाला ॥८५॥ गोट्या

भोवरे चकरी । चेंडू विटी भिरभिरी । बावडी चिमनी बासरी । वाजविती स्वानंदे । ८६ । गंजफा बुद्बळे सोंगटी । हुतुतु चेंडूफळी सुरपाटी । द्युत फासे झाकिती दृष्टी । हुडकिती एकमेकां । ८७ । डाबकुही दगड आपटती । धाबड आणि चाबुक पिटी । कावड अंधळी काकडाप्रीष्टी । घालुनिया ओळखिजे ।८८। एकमेकासी भांडती । चापठा बुक्या मारिती । पाडुनी उरावरी बसती । रडत जाती गृहाते । ८९ । सर्वेचि येती मिळूनी । विनादे बोलती हास्य करुनी । आपुलाले खाद्य आणोनि । करिताती पंगत्या । ९० । त्यामाजी श्रेष्ठ बाळकृष्ण । जैसा गोपाळांत श्रीकृष्ण । शोभायमान दिसे उष्ण । जेवी अंधःकारासी । ९१ । बहुत नक्षत्र असती । स्वतेजाने वर्तती । चंद्रापुढें दीसती मंदरूप स्वभावे ।९२। तैसे लहान थोर बाळक । परस्परे बोलती अनेक । परि समोरे येता सकळिक । मानिती वचन कृष्णाचे । ९३ । ऐसे नित्यानित्य खेळती । माता पिता प्रिय मानिती । कौतुकें करुन पाहती । बाळकृष्णासी आदरे । ९४ । विद्या शिकावयासी । लिहू घातले शाळेसी । दोन वर्ष भरता त्यासी । विद्या आली समग्र । ९५ । अष्ट वर्ष प्राप्त झाले । उपनयन आरंभिले । व्रत धरोनि सर्वेचि केले । समावृत मुंजीचे । ९६ । बाळ खेळत खेळत । गेले देवीचे देवळांत । वंदूनी आंबेसी बाहय येती । प्रदक्षणा कारणे । ९७ । प्रदक्षणा तीन घालुनी । बैसला पुढें येवुनी । योगीश्वरी आणोनि ध्यानीं । अवलोकी तिजला । ९८ । तितक्या माजी ग्रामवासी । व्यास आले दर्शनासी । वंदूनिया देविसी प्रदक्षिणा घातिल्या । ९९ । सर्वेचि आले बाळका जवळी । अवलोकिले मुखकमळी । तंव मूर्ति दिसे सावळी । सकुमार बहुत । १०० । पाहुनी शरीराकृती । आनंदयुक्त झाले चित्तीं । कन्या एक लावण्यवति । पोटीं असे आपुल्या । १ । तिजला हाचि वर । पाहुनि रासी नक्षत्र । नेम करावा सत्वर । घटित उतरता । २ । ऐसे चिंतुनी अंतरीं । मग बाळकाते धरुनि करीं । घेऊनि आले ग्रामाभितरी । जाते झाले निज सदना । ३ । दुसरे दिवशीं सूर्य उदयाते । वधु नक्षत्रादि समस्ते । लिहुनी आणिले स्वहस्तें । सत्वर ते काळीं । ४ । येवोनि गदाधराप्रति । वंदून केले बहुप्रीति । असीवचन

करुनी म्हणति । येणें केले किरूर्थ । ५ । तंव म्हणें माझी कन्या वधू । लावण्य अनुसया प्रभा इंदू । बाळकृष्ण वर संबंधु । व्हावा ऐसे वाटते । ६ । परी मी आहे दुबळा हीन । तेव्हां कोहळे सहजचि नग्न । आपण यास्तव सुतऊन । घ्यावे माझे सत्वरी । ७ । वधू वराचे घटित । राशी नक्षत्रावरून पाहत । षडत्रिंशतगुण संख्यात । उतरले असे ।८। वधु वर जोडोनि । पहावे ऐसे वाटते मनीं । तंव व्यासाने कन्या घेऊनी । धांवत आले सत्वर । ९ । वधू स्वरूप लावण्यवती । रोहिनी धवप्रभा दीप्ती । उभय जेवी लक्ष्मीपती । उमाकांत दुसरा । १० । ऐसे लक्षणी वधू वर । उभयपक्षी आनंद थोर । साहित्य करावे समग्र । लग्नकाल समीप आला । ११ । नेम करूनी सुपारी । एकमेका दिधली करीं । मग आपुलाले घरीं । सिध्द केलें साहित्य । १२ । उदईक असती लग्न । आज केले देव-ब्राह्मण । तुरे मंडप देऊन । देवप्रतिष्ठा करिती । १३ । भोवलें घातीलें वधू ग्रहासी । सिमन्तपूजा करावयासी । परन्या निघाला मारुतीसी । अश्वावरी बैसोनिया । १४ । वाद्यनाद पुढें गर्जती । नानाप्रकारें दारु उडती । ध्वजा मस्तकी धरिती । ढाळिताती चामर । १५ । दारुचे प्रकार बहुत । परी सांगतों नेमस्त । एकाग्र करुनी चित्त । सज्जनि परिसावे । १६ । भोयनळे चंद्रज्योती । हातनळे कतबती । तडकीनळे उंच उडती । आणीकही बहुत ।१७। हिंगणबेट चक्रबान । बेल नारळ आकाश वान । कवीट केळी संपूर्ण । वृक्ष नाना प्रकारचे । १८ । जाई जुई शेवंती । मोगरी आणि मालती । द्राक्षादि समस्ती । मांडवे घातले । १९ । फुलबाजी फटाकी । चुचुंद्री आणि तोटकी । जावाज सुटती बंदुकी । बुरूज पडदे समवेत । २० । गुबारे सेंगा घागरी । हरिण घारी पिंजरी । व्याघ्र सुटती तारी । जैसे नक्षत्र आकाशीचें । २१ । या प्रकारे करुनी । दारू समग्र उडवोनी । सिमंतपूजा समर्पूनी । तांबुल दक्षणा वाटिले । २२ । सर्वे घेऊनी पवन सुत । निघाले वरासमवेत । पावले वधु मंदिरांत । लग्न घटिका भरली असे । २३ । मिळाले विप्र सकळीक । वधु वर उभे सम्यक । बोलती मंगळाष्टक । सावधान करा त्या । २४ । घेऊनी अक्षदा करीं । जन टाकिती उभयावरी । गजर होतसे बहु भारी ।

टाळ्या पिटिती समस्त । २५ । कन्यादान पाणीग्रहण । मंगळसुत्रादिक कंकण । मधु पर्कादि हवन । याज्ञकी सांगती । २६ । पुढें कळवातिनी नाचती । तांबोल सर्वांसी वाटती । दक्षणा ब्राह्मणासी देती । ब्रह्मानंदे करूनिया । २७ । सुन्मुख तेलवनिसी । विहिणी येवोनी पाय घासी । फेकितातो गुलालासी । एकमेका सोयीरे । २८ । भोजना बैसती पंगती । पक्कान्ने बहु वाढिती । समया लावोनी उदबत्ती । रंगमाळा काढिल्या । २९ । बहु प्रकार अन्नाचे । ते न सांगवती वाचें । परी सार सार याचे । नाममात्र सांगतों । ३० । लवन पापड कुरवडी । गोज्य चटण्याचे परवडी । पंचामृत आणि तिळवडी । मेथकुट मेथ्याचे । ३१ । मुळासहित कोशिंबीर काकडी । मीरवोडे कोहळेवडी । राइतें लिंबाचे फोडी । लाख । पल्लव फळाच्या । ३२ । दोडकी वांगी कारली । चमकुरा मेथी भोपळी । शेंगा गवारी पडोळी । वाढिती पात्रांत । ३३ । वडे वडया फुगे उडदाची । वरण आंबट कढी ताकाची । साखरभात पोळी सपिटाची । क्षिरी प्रकार बहुत । ३४ । दुटवे मालती शेवाई । सरोळे नखुळे पोही । फनुले बिजदाहि । पायस वेगळे ।३५। आनारसे लाडू करंजी । दळबुंदे बेसन खाजी । मांडे फेनी जिलबी ताजी । तूप असें लोणकडे । ३६ । जेविती सोईरे समस्त । वाढिती आग्रह करीत । गायक अर्याश्लोक म्हणत । वाजताती चौघडे । ३७ । सत्वर उठले जेवोनी । बैसविती सभास्थानीं । आणिती तबक भरोनी । तांबुलाचे सत्वर ।३८। पान सुपारी कात केवडी । जायफलपत्री वेलदोडी । चुना कापूर खोबरें तुकडी । बादामबीज कस्तुरीचें । ३९ । ऐसे त्रयोदश गुणी । विडे केलें चतुष्कोणी । लवंगावरी टोचोनी । समर्पिले सर्वांतें । ४० । आनंदयुक्त अंतरीं । मिळुनी वधू रुषे नारी । रुखवत घेउनी करीं । वराग्रहीं समर्पिले ।४१। बादाम खारीक खोबरी । गोडंबी चारुळी सुपारी । फराळादि वळवट कुसरी । पाटया भरुनी दिधल्या । ४२ । संगे घेउनी वधू वर । गुलालाचे होती मार । मिरविती पायघडीवर । चंद्रज्योती लाउनीया । ४३ । आलें वधू मंदिरीं । वरमाई करवली मानकरी । बैसोनी चौफल्यावरी । नाहु घातले स्वानंदें । ४४ । साडे करावया सोईरे । मिळती विप्रादी समग्रे । गुलाल रंगाचे पिचकारे ।

एकमेकां मारिती । ४५ । कलवांतिणी नाचताती । तांबुल सर्वांसी वाटिती । नाना वाद्यें वाजती । दाटी झाली अपार । ४६ । साडे करुनी नोवरिसी । वरमाय घेउनी अंकासी । अलंकार बहु सरसी । घालिती स्वहस्तें । ४७ । राखडी मुद केवडा । केकत त्रिफुल गोंडा । बिजवरायुक्त जाळीदांडा । घातिले मस्तकीं । ४८ । बुगडया पंखे निळी । घाटे जडीत घोसबाळी । सरी आणि गरसळी । पांच पदरे मन्याचे ।४९। हरपार रेवडी बोरमाळ । चंद्रहार पुतळी जवमाळ । दंडीं वाकया बाजुबंद सरळ । कंगनी पाटली हतसरे । १५० । गोट तोडे कंबरपटा । जडित-मुद्रीका पांची बोटा । विरुदे जोडवे अनवटा । साकलया रूळ नथ सरज्याची । ५१ । साडी पितांबर चिरडी । पैठणी शिलारी लुगडीं । घटी पाटाउ तुकडी । किनखापी कंचुकया ।५२। या प्रकारें वधुसी । लेवविलें भुषणासी । आतां वरालागी कैसी । आणिती तें पाहवें ।५३। मंदील आंगीं शेलें पागोटी । पितांबर दुशाला धोत्रकाठी । मुद्रिका कुडकया पदकी कंठी । कडे तोडे कटीसुत्र । ५४ । तांब्या पळी संध्यापात्र । देवपूजादि पंचपात्र । आणखी भांडें सर्वत्र । यथाविधी दिधलें । ५५ । कन्या बेवोनी पिता करी । उदकानें नेत्र भरी । वोसंगी घाली सत्वरी । सांभाळा म्हणतसे । ५६ । संपूर्ण साडे झाले । वधू वरें धेंडे नाचविले । मस्तकीं बाशिंग बांधिलें । निघते झाले मारुतिसी । ५७ । सव्य घेउनी सुत अंजिनी । मिरवीत आले वरा सदनी । पूजा लक्ष्मीची करुनी । धर्म करिती सर्वांतें । ५८ । ऐसा चार दिवसपर्यंत । सोहळा झाला अद्भुत । वराडी सोयरे समस्त । अहेर करिती आपुलाले ।५९। विवाह संपूर्ण करुनी । सायरे गेले आपुलाले सदनी । मंडपादिक सोडोनी । वधू वर गृहीं राहिले । १६० । दो पक्षीं आनंदरूप । वास करी सुखरूप । सच्चिदानंद स्वरुप । आठविती वेळोवेळा ।६१। एवं कथा जालेली । सार सार कथन केली । पुढील अध्यायीं वेगळीं । श्रवण करा सुरस । ६२ । नित्यानंद ब्रह्ममूर्ति । देशिकानंद स्वयंज्योती । शेष म्हणे माझे चित्तीं । सदोदित वसावे । ६३ । इतिश्री देशिकलिलामृत । पुराण नाहीं काणते संमत । नुतन कथा सज्जन परिसोत । द्वितीयोध्याय गोड हा । १६४ ।

# अध्याय ३ रा.

श्रीगणेशायनमः श्रीगुरूभ्योनमः । जय जय भवानी शंकरा । नित्यानंद करुणा करा । वामदेवा त्रिपुर हारा । बिल्व प्रिया नमोस्तुते । १ । गज चर्मा त्रिशूलेशा । कालाग्नी रुद्ररुपेशा । सर्वेश्वरा मनोन्मनेशा । श्रेष्टाय नमोनमो । २ । अघोर घोरा महाबला । शंखनादा त्रिकाग्नीं-काला । दिनबंधु परम कृपाळा । माय बापा श्रेष्ठतु । ३ । कैलासवासा दक्ष जामाता । घंटा डमरु खडग हस्ता । काम क्रोधादि निःपाता । मन मोंहना बलाये । ४ । विभूती भुशा सर्वोतमा । कमाळ माला सार्वभोमा । अमंगल सीला भगवोतमा । सर्व भुत निवाशी । ५ । भवमोंचका भवाब्धीवासा । ब्रह्मांड रूपा ब्रह्मांड ग्रासा । अरूप रूपा स्वरूप भासा । सर्व भूता सर्वांतरी । ६ । भक्त काम कल्प द्रुमा । साक्षीभुत गुणकर्मा । नातळशी अलिप्तवर्मा । कपर्दिशापशुपते । ७ । चैतन्य नित्यशाश्वता । नाद बिंदु कलातिता । प्रगटविशी पंचभुता । विश्वरूपा परम गुरू । ८ । तत्व मस्यादि त्रिपदा । सच्चीतानंद संपदा । भेदातीत ब्रह्मकंदा । भोगीसि स्वानंदे । ९ । श्रोतें सावधान व्हावे । मागील अनुसंधान धरावे । म्हणजे पुढील कथा स्वभावे । स्फूत होती अर्थ रस । १० । तंतु धरूनी पुर्वीचा । पाजनी जोडिती साचा । मग पट विनावयाचा । न पडे आयास । ११ । पाया धरूनी भिती । घालिता दृढ निश्चीति । थर लाविण्याची युक्ती । साधनेची नको । १२ । मुळ सोडिता रचना केली । ती तात्काळ दृढ वाढली । सिध्द होताची ढासळली । वृथा जाले कष्टे ते । १३ । तैसे न करावे श्रवण । करुनी एकाग्रमन । पूर्वानुसंधान धरून । अर्थानुभव घेईजे । १४ । ऐसे वक्ता न बोलावे । परी कार्यानुसार वर्तावे । किर्तनी हरदासाशी स्वभावे । अठव देती मावीलचे । १५ । आठव दिधला म्हणोनी । काय झाली तयाची हानी । विशेष रंग किर्तनी । होतसे हरदासा । १६ । तैसे तुम्ही हरदास । मी आहे दासानुदास । आठवितो कथारस । श्रवणी धरावे । १७ । मुख्य कर्ता ईश्वर । त्याचाची हा बडीवार । परी उभयाचे भक्तोपचार । जाणीतो निजनिष्टा । १८ । या कारणे उभयता ।

स्वस्त असावे श्रोता वक्ता । सोडूनी संसार चिंता । लक्ष द्यावे कथेशी । १९ । कीर्तनी लक्ष लागता । हाता चढे अलक्षता । लक्षालक्ष द्वया-तिता । होताती जीवब्रह्म । २० । लक्षालक्ष साधु निवृत्ती । ईश्वरी जीव भोगिती । अंतरबाहय ब्रह्म स्थिती । बाणतीतत्प्रसादे । २१ । पुरे आता ब्रह्म स्तवन । मागील अध्याई केले कथन । बाळकृष्ण अनुसयाचे लग्न । संपूर्ण झाले तयामाजी । २२ । आता माझी विज्ञापना । कृपाळूवा संत सज्जना । या अध्याई चरित्र रचना । परिसावी निवांत । २३ । बाळकृष्ण सगुणराशी । चातुर्य बुध्दी स्वये प्रकाशी । जमा खर्च विद्या त्याशी । प्राप्त झाली पूर्वीच । २४ । वेदाध्ययनी प्रारंभ । पुजा करुनी हेरंभ । ॐकार पूर्वक पद्मनाभ । अटविलासप्रेमे । २५ । पूर्ण झाले वेद पठण ।मग पहाती शडदर्शन । पुराण विस्पती संपूर्ण । प्राप्त झाली तयाशी । २६ । न्याय व्याकर्ण वेदांत । ज्योतिष्यशीध्द गनीत । मंत्र प्रयोगादी समस्त । वैद्यशास्त्र वेगळे । २७ । नूतन विद्या प्राप्त झाली । वैद्यक्रिया आरंभिली । औषधी करु लागली ! भस्म मात्रादी घुटिका । २८ । एके दिवशी चमत्कार । औषधाचा मांडिला प्रकार । दुध आणोनी दोन शेर । दही करावे वाटले । २९ । सायंकाळचे समयात । बचनाग घातला दुधात । सूर्योदय पर्यंत । दधी सिध्द झाले ।३०। दधी घेवोनी करी । माता पित्याशी हाका मारी । धावत येती सत्वरी । भगिनी समस्त । ३१ । बाळकृष्णाशी पुसती । कशास्तव पाचारिले म्हणती । आनंद भरीत बहु प्रिती । जवळ बैसले । ३२ । जैशी धेनु असती वनी । पाडस रहाते सदनी । शब्द वत्साचा ऐकुनी । धावत येती हुमरत । ३३ ! घार हिंडती अकाशी । दृष्टी सारी कुरुट्यापाशी । वेळोवेळा बाळकाशी । अवलोकी येवोनिया । ३४ । वावडी उडे गगनात । सुत्र धरिती हास्तात । परी लक्ष अखंडित । तयावरी नराचे । ३५ । व्यभीचारिणी नारी । तत्पर पतिचा संसारी । पर पुरुष अंतरी । चिंतीति सर्वदा । ३६ । द्रव्य लोभी कीर्पण । ग्रही पुरिले भुमित धन । नविसंबे एकही क्षण । ध्यान दृष्टी तयावरी । ३७ । कुंभ घेउनी उदका जाती । येका वरी एक रचिती । हात सोडूनी चालती । परी लक्ष वटाचे । ३८ । या प्रकारे माता पिता ।

अखंड पाहती निजसुता । म्हणती अनुसया नाथा । बोलकिरे पाडसा । ३९ । तंव म्हणें दही फार चांगलें । म्या रात्रीं विर्जु घातलें । शरीर आरोग्य आपुले । भक्षिता होईल । ४० । शरीर आरोग्य होण्यासी । कोणतें घातलें औषधिसी । म्हणोनी पुसती कृष्णासी । दधीमाजी सांग बरे । ४१ । तंव म्हणें खजूर नाभीते । उष्ण करुनी दुग्धाते । मिश्रित केले उभयाते । स्वये जाणा मिशीकाळीं । ४२ । सूर्योदयपर्यंत । विर्जलें दुग्ध समस्त । उत्कृष्ट म्हणो तुम्हात । पाचारिले भक्षावया । ४३ । तंव म्हणती वत्साबाळ । दधी नोहे आला काळ । भक्षिता प्राण तात्काळ । जाईल निश्चयेसी । ४४ । या कारणें दह्यासी । न भक्षावे साचेसी । आमचे वचन मानसी । दृढत्वा धरावे । ४५ । दधी पाहता सत्वर । भक्षील त्याते मार्जार । प्राण रहित शरीर । होईल तयाचे । ४६ । गार करुनी भुमीते । दधी टाकुनी तयाते । मृत्तिका घालुनी वरुते । अदृष्य करावें । ४७ । तव म्हणें मह। औषधी । म्या निर्मिली जरासंबंधीं । प्राण त्याग न होय कधीं । भक्षावें किंचित । ४८ । ऐकोनी म्हणती राजसा । आम्ही न भक्षु सहसा । तुही प्राशूं नको पाडसा । प्राण घातकी औषधी । ४९ । विष वस्तू घातकी जीवा । त्याते स्पर्श कधीं न करावा । सज्जनी विचार धरावा । हृदयामाजीं । ५० । विष पदार्थाचा सहवास । करितां प्राहिक आले प्राणास । ऐसे जाणोनी त्यास । दुरीच त्यजावे । ५१ । स्थावर जंगम विष दोन्ही । पूर्ण जाणती जे वर्म मनी । अंगीकार करावा तयांनीं । कार्याकार्य जयांचा । ५२ । पदार्थाचे जाणोनी वर्म । करितां होती सफल कर्म । अज्ञानाचा नसे धर्म । सत्य सत्य त्रिवाचा । ५३ । या कारणें सकुमारा । दूर करी वीष विखारा । बैसूं नको अज्ञानाचे थारा । वचन सत्य जाण तूं । ५४ । तंव मनी विचार करी । औषधीची परीक्षा पुरी । अनुभवावाचुनी कोणेपरी । जाणावे कैसे ते । ५५ । सत्वर उठोना गृहांत । दधी घेतलें करांत । मुखीं घातिलें किंचित । पात्र ठेविलें फडताळीं । ५६ । परीक्षेनरूप औषधी । साध्यासाध्य जाणील बुध्दी । तदनुसार याची विधी । करितां येईल । ५७ । ऐसे चिंतुनी अंतरीं । निघाले गृहाचे बाहेरी । स्नान करुनी सत्वरी । उपहार सेविला । ५८ । मग शास्त्र पढावयासी गेले गरुचे गृहासी । क्षण

लोटता शरीरासी । गुंग केले तात्काळ ।५९। शौचाचा विकार । प्रगटला बहु थोर । न धरवे इन्द्रिया धीर । वेळोवेळा गमन करी । ६० । तंव उठोनी स्वगृहाप्रती । स्थीर चाले क्षीण प्रकृती । रक्तवर्ण नेत्र दृष्टी आकिती । मुर्छित पडले येउनिया । ६१ । मुख म्लान बालकाचें । कीं रुथें झालें म्हणती साचे । माता पिता निज वाचें । बोलती स्वभाविक । ६२ । जवळ येउनीया पाहती । तव मुर्छित पडला निश्चिती । सावध करुनी पुसती । काय झाले तुजरे । ६३ । मुर्छना सावरुनी कांहीं । म्हणें औषधीक पूर्वी दही । किंचित घातलें हृदयीं । परीक्षा कारणें । ६४ । त्याज पासुनी इंद्रियासी । धीर नाहीं शौच्चासी । अंधारी येउनी आकाशीं । नेले ऐसे वाटते ।६५। ऐकोनी बाळकाची वाणी । शरीर टाकिले धरणी । हर हर शिव म्हणोनी । शोक करूं लागले । ६६ । म्हणती आम्ही बहुत । सांगितले बाळा तुत । न ऐकोनी आमची मात । भक्षिले दह्यासी । ६७ । वैद्य गुरुसी पाचारिले । त्यानें शरीर नाडी अवलोकिले । म्हणती विष अंगीं भरलें । विनाशकाल दिसतो । ६८ । दूध आणावें सत्वर । पाषणा द्यावे वारंवार । मळ वांती होईल उतार । मृत्युभय नसे यासी । ६९ । प्राणांत होईल अवस्था । शरीरा येईल क्षीणता । परी वृत्तीस प्रसुप्ता । सर्वथा येऊं नये । ७० । श्रवण करुनी वैद्य वचन । मेळविले दूध संपूर्ण । पाषणा देती तयालागुन । क्षणोक्षणी चेववितो । ७१ । दुग्ध घालितां उदरांत । त्याचें शुध्द दधी निपजत । वांती द्वारा बाहेर येत । उष्णते करुनिया । ७२ । जंव जंव उतरे विष । तंव तंव वृत्ति निर्विशेष । चलन वळनादि निःशेष । राहिले तयाचे । ७३ । अक्रोश करिती माता पिता । सासु सासरे आप्तजन समस्ता । मिळोनी भगिनी आणि कांता । नाना-प्रकारे आठविती । ७४ । बहु करितां नवस । पुत्र झाला एक राजहंस । प्राणाहुनी प्रिय विशेष । वाटतो सर्वांसी ।७५। माझा एकुलताएक बाळ । परम प्रियकर स्नेहाळ । दधी झाले तया काळ । गिळिले सकुमारा ।७६। शिव शिव हे शंकरा । सृष्टि स्थिती प्रलय करा । धारण करिसी दशावतारा । पावुनी महा संकटीं ।७७। जैसे चित्रांगद राजासी । वाळेंही काळ झाली त्यासी । तीन संवत्सर तक्षकापासी । वास केला तयानें । ७८ ।

प्राणाहुनी प्रिय अधीक । पालन करी नागराज तक्षक । नाग नागिणी सेवक । अनुदिनी रक्षिती । ७९ । गृहीं असती माता पिता । आकांत करील माजी कांता । सिमिंतनी लावण्य पतीव्रता । प्राण त्यागील मजसाठीं । ८० । कैलासनाथ उमास्वामी । शक्ती वास करिती धामी । तया भजतो निष्कामो । अनुदिनी महाराजा । ८१ । ऐकोनी वचन चित्रांगदाचें । सद्गदीत अंतर नागराजाचें । बळ आयुष्य संपदाच । वरदान दिधले । ८२ । उदकाबाहीर आणोनी घातले । शिवप्रसादें राज्यावरी स्थापिले । सिमिंतिणीचें व्रत आगळे । पाहुनिया संम्यक । ८३ । कालिंदीनें गिळोनी उगळीलें । काळानी ग्रासुनी सोडिले । जनक जननी कांता भेटले । महाकाळ महादेवा । ८४ । आणखी महानंदासी । पावकामाजी तारिले तिशी । नगरासमेत कैलासी । ठाव सर्वांसी दिधले । ८५ । भद्रसेन पृथ्वीपती । त्याचा सुत सुधर्मराज नृपती । काळे गिळीला होता निश्चिती । द्वादश वर्षानंतर । ८६ । शिवभजन शिवानुष्टान । भद्रसेन करी रात्रंदिन । काळे उगळीला नंदन । प्रसादें जयाचा । ८७ । चांगुणाचें धैर्य पहावया । अतीत वेषें काळ होऊनिया । नरमांस मागे भक्षावया । चिलीया बाळाचें । ८८ । तव सत्वधीर चांगुणा सती । अंकीं घेवोनी बाळकाप्रती । छेदन केलें शीर निश्चितीं । निजहस्तें करुनिया । ५० । पक्व करुनी नरमांस । वाढिलें पात्रीं अतितास । तव म्हणे निपुत्रीकाचे गृहास । भिक्षा नाहीं आमची । ९० । ऐकोनी अतिथीचें उत्तर । शोक करिती नाना गहिंवर । संतोशूनी उमावर । प्रगट केलें स्वरुपासी । ९१ । पंच वदन गंगाशिरीं । त्रिशूळ डमरु आयुध करीं । म्हणे वर माग सत्वरी । सत्वधिरा भूपते । ९२ । तव कर जोडूनी उभयता । प्रार्थना करिती उमानाथा । आम्हा कलंक लागला आतां । निपुत्रकेचा राजकुळीं । ९३ । एवढा कलंक आमचा । दूर करावाजी साचा । अखंड आपले चरणाचा । निजठाव मिळावा । ९४ । आनंदें हास्य करुनी । वर दिधला त्रिनयनी । हाक फोडिता तत्क्षणीं । धावत आला चिलियाळ । ९५ । प्रेमभरित माता पिता । पोटीं धरुनी निजसुता । चरणीं ठेविती माथा । ब्रह्मानंदे करुनी । ९६ । शंकरे वर देऊनी । अदृश्य झाला तत्क्षणीं । बहुत दिवस राज्य

करुनी । अंतीं शिवपदा पावले । ९७ । लक्ष्मणासी लागली शक्ती । दश वदन काळ झाला तयाप्रति । हनुमंते वाचविले निश्चिती । द्रोणवल्ली आणोनिय । ९८ । हनुमंत केवळ ईश्वर । महारुद्राचा अवतार । महा संकटी जटाधर । प्राप्त होतो भक्तासि । ९९ । समुद्र मंथन करितां । देव निशाचर उभयता । रवि मांदार शेषसुत्र हस्ता । चवदा रत्न निघाले । १०० । त्यामाजी एक रत्न थोर । हाळ हाळ विष नाम आघोर । ग्रहण करावया कोणाचे धीर । नसे देव दैत्यांचे । १ । या कारणें देव दैत्य । संकटीं पडले अत्यंत । म्हणती महा विषांत । ग्रहण कोणें करावे । २ । मिळुनी देव निशाचर । आले शिवाचे समोर । प्रार्थना करिती वारंवार । दिनबंधु दया करी । ३ । आम्ही अनाथ आहो दीन । वातां उघडावे कृपा नयन । क्षणोक्षणीं धरिती चरण । तारी तारी म्हणोनिया । ४ । दयावंत दयानिधी । कर्ता हर्ता सर्व विधी । निर्विशेष झाउनी समाधी । सविशेषी प्रवर्तला । ५ । गहिंवर देव निशाचरी । अकांत करिती एक सरी । ऐकोनी वदे गंगाधरी । काय झाले तुम्हाते । ६ । तव म्हणती महा दारुण । विष निघाले सागरांतून । कोणाची शक्ती ग्रहण । नाहीं करावयासी । ७ । याकारणें आपणासी । शरण आलों चरणासी । आतां संरक्षण आम्हासी । करावेजी अनंता । ८ । तव करुणाकरे हस्त वढुन । हातीं घेतलें विष दारुण । ॐ ब्रह्मास्मी म्हणून । प्राशण केलें तयासी । ९ । तदि पासुनी निळकंठ । नाम आलें शशी मुकुट । गंगाजालीसे प्रगट । तदीपासुनी । ११० । मग देव दैत्य मिळोनी । आनंदे पुजिलें गदापाणी । महा संकटीं निर्वानी । रक्षिलें सर्वांते । ११ । म्हणोनी देवाधि देवा । समर हर महादेवा । गजचर्मा सदाशिवा । गजर करिती स्वानंदे । १२ । या प्रकारे देवाधि रूपा । प्रसन्न झालासी विश्वरुपा । आमचेवरी अवकृपा । कोणत्या दोषानें । १३ । कोणाचें फळ तोडोनी । पूर्वी आणिलें चोरुनी । किं जळचरा अंतरिले जिवनी । शुष्क भुमिसी टाकिलें । १४ । वत्स ठेउनी गृहासी । धर्म केले धेनुसी । किं राघुचे पिलासी । आणोनी पिंजरीं घातले । १५ । दुबळयाचे घेउनी धन । त्यासी केलें बळे ताडन । सर्व द्रव्य अभिलाषून । त्यागिले तयासी । १६ । मार्गीं चालतां अंध दृष्टी । त्याची हिरोनी घेतली

काठी । जेवीत होता ताटी । उठविला कीं काय त्यां । १७ । आपणासी पुत्र नाहीं म्हणोनी । दुसरियाचे लेकरा केली करणी । किं पात्रक लाविले सदनी । नाश केला जीवाचा । १८ । विषयप्रिती धरुनी । बालका टाकिले वनीं । धर्म करितां त्यांत हानी । केली असे वाटते । १९ । गौरीहाराची पूजा भंगिली । कीं घृत धरुनी मध्येंच सोडिली । कीं गुरुची निंदा केली । आपला नाहीं म्हणोनिया । १२० । आपण भक्षिलें देवान्न । परा वाढिलें कदान्न । कोणाचा केला अपमान । पंगतींतुनी उठविले ।२१। कपट धरुनी अंतरीं । भक्ती प्रगट जना सामोरी । सेवा करुनी माघारी । बोलिलें कुवचन । २२ । कोणी पूजा करिती गुरुची । अविचारे दुष्टपणें त्याची । सांगोनी गोष्टी विनाशाची । भंग केली किं काय हो । २३ । आपणावरी कोणाची प्रीति । मध्यांतरी झाली अप्रिती । मग त्याजला दुसऱ्याप्रती । आणिली विक्षेपता । २४ । मुखावरी बोलिले एक । माघारी दुषिले अनेक । थोडे बहु ज्ञानाचे टेक । धरुनियां मानसी ।२५। देतो म्हणोनी कोणासी । चाळविले तयासी । कांहीं अर्पिल्या दानासी । परत घेतले कीं काय हो । २६ । आपुलें कार्य साधुनी । मग दिधले लोटुनी । पर सुखी अवलोकुनी । दुष्ट चिंतीले मनांत । २७ । संत सेवेसी अनुसरले । त्यासी विक्षेप आणिले । विपत्ती व्हावी म्हणोनी चांगले । विचार सांगे तयासी । २८ । पराचे आणिक आपुले । बालक भोजना मिळाले । दही दूधासी प्रपंचिले । ऐसे केले काय तरी । २९ । आपल्या बाळकांत । दुःख झालें बहुत । म्हणोनी पर जीव घात । केला काय दुर्बुद्धी ।१३०। आपण सेवा न करावी । दुसरियाते करूं न द्यावी । भगवद्भक्त कष्टवावी । शरण यावे म्हणोनिया ।३१। कळोनी गोष्टी आपणाते । उगे छोडिले पराते । किं धरुनिया गाईते । दिधले कसाबांसी । ३२ । दुर्बुद्धीच्या गोष्टी ऐकोनी । तदनुसार केली करणी । सुबोध सांगता मनीं । धरिला नसे काय त्यां । ३३ । पोटीं पुत्र असुनी चार । दुसरा केला भरतार । त्याते लाविले दारोदार । विषय सुखा कारणें ।३४। पाणी घालुनी वृक्ष लाविलें । प्राणाहुनी अधीक पाळिलें । रोपे जाउनी उपडिलें । कष्टविलें तयासी । ३५ । देवापुढें लाविता दीप । त्यांत आणिला विक्षेप । म्हणोनी माझा कुळदीप । मालविला पापानें ।३६।

दाहत असतां जीवन । त्याचें केले मार्ग खंडण । किं तुळशीवृक्ष उपडून । मूळ दाविलें सूर्यासी । ३७ । कोणत्या कर्माचें पातक । काळानें गिळिलें बाळक । आम्ही वाचुनी काय सार्थक । होईल या जन्माचें । ३८ । प्राण त्यागावा । म्हणोनि । अंग घालिता धरणीं । मुर्छागत होउनी । पडताती क्षणोक्षणा । ३९ । जयजयाजी चंद्रमौळीं । कृपादृष्टीं करुनी न्याहाळीं । त्र्यंबकेशा विभुती भाळीं । माजीया पाडसाते । १४० । देशिल जरी अमृत संजिवनी । बाळ उठेल तत्क्षणीं । वचन परिसावे निर्वाणी । त्रिताप हारा भगवतेशा । ४१ । तव ऐकोनी निर्वाण गहिंवर । वैद्यरुपे आला सत्वर । संजिवनी मात्रा शंकर । उगाळिता झाला । ४२ । भरुनी पात्रीं अमृत । स्वयें घातलें मुखांत । अंगी फिरविला करुणा हस्त । सुखी उठावे म्हणोनिया । ४३ । औषधी घालुनी उदरी । म्हणे बाळाची चिंता न करी । एक घटिका लोटलेवरी । सावध होईल पाडस । ४४। ऐसे बोलोनी वैद्यवाणी । सत्वर निघाला तेथुनी । दाराबाहेर येता क्षणी । गुप्त झाले सदाशिव । ४५ । दोन प्रहर यामीनिशी । एक घटिका कमी त्यासी । तोपर्यंत काळाचे फाशी । गुंतलासे राजस । ४६ । ही घटिका जाईल केव्हां । महा काळांत वाटतो आम्हा । कशी करुणा नये तुम्हा । भुजंगभूषा पशुपते । ४७ । माझा उठविशील बाळ । हरोनी त्याचे विष सकल । पाजवी कृपामृत रसाळ । परात्पराजगत्पते । ४८ । मांडीवरी घेउनी नन्दन । माता आठवी गुण गहन । वारंवार मुख चुंबन । घेत असे बाळाचे । ४९ । राहुग्रस्त रोहिणी पती । तैसी झाली वदनाकृती । दीन होवोनी अवलोकिती । क्षणोक्षणीं सर्वत्र । १५० । कांता दीन शोकातुरी । म्हणे सौभाग्य जहाज सागरीं । बुडविलें काळ मगरी । गिळीलें प्राणनाथा । ५१ । भवतरुचें सौभाग्य फळे । समुळ उपडिले समीर काळे । पाहुनी माझे लिंग विकळे । प्राणनाथास्तव । ५२ । अंतरीं करिती चिंतन । जरी येईल गतः- प्राण । शिवव्रत अनुदिन । अनुष्टीन अभीकोतरे । ५३ । सर्व आपुलाले हृदयांत । नवस करिती उमाकांत । दूर करिसी मृत्युत । दंपत्य पूजा करूं आम्ही । ५४ । घटी भरता संपूर्ण । सावध झाला बाळकृष्ण । कलंकरहित शुभानन । स्वरूप प्रभा फाकली । ५५ । उठोनी बैसला सकुमार । आनंदे

भेटती वारंवार । माता पितादि समग्र । आठविती भवानिशा । ५६ । जैसा चौदा वर्षानन्तर । कौसलेस भेटला रघुवीर । तैसा आम्हासी अनुसयावर । चौदा वर्षी भेटला । १५७ । सूर्योदय झालयावरी । ब्राह्मणा आमंत्रणें घरोघरीं । सांगोनिया शिवावरी । अभिषेक धारा धरिल्या ।५८। महारुद्र दंपती पूजन । सांग केलें यथा विधीन । भोजनादि दक्षिणा देऊन । सतुष्ट केलें सर्वांसी । ५९ । संतोषोनी सर्व ब्राह्मण । आनन्द कल्याण अखंड पूर्ण । मंत्राक्षदादि असीर्वचन । देवोनी सदना पातले । १६० । मग नित्यानित्य घरीं । शिवाराधना ते करी । जनक जननी अंतरी । प्रेमयुक्त अनुसया । ६१ । प्रदोष सोमवार शिवरात्र । व्रत करिती सुपवित्र । अखंड जपती शिवमंत्र । सच्चिदानंद सद्गुरु । ६२ । लिलाचरित्र सारासार । प्रसन्न होउनी उमावर । संजीवन झाले कृष्णकुमार । गदाधराचे कंठमनी । ६३ । याप्रकारे कथानु संधान । जें जें झालें तें केलें कथन । आतां पुढील अध्यायीं निरुपण । महारसीक होईल तें । ६४ । भवांतक भव प्रकाशीं । निर्विकार सगुण राशी । देशिकानंद ऋषीकेशी । रक्षी माते शेष म्हणे । ६५ । इतिश्री देशिक लिलामृत । पुराण नाहीं कोणतें संमत । नुतन कथा सज्जन परिसोत । त्रितियोध्याय गोड हा । १६५ ।

# अध्याय ४ था.

श्री गणेशायनम; । श्रीगुरुभ्योनमः । जयजयाजी चंद्रमौळी । मद मत्सर कानन जाळी । दिनानाथ कृपे पाळी । भक्त वत्सला बसवेशा । १ । सोमनाथ सर्वेश्वरा । महा काळ गिरीजावरा । वृषभध्वजा भीमाशंकरा । परम पुरुषाधिपते । २ । मल्लिकार्जुन अमलनाथा । विश्वेश्वरा वैद्यनाथा । घृष्णेशा नागनाथा । शशिखंडादि मुर्ती । ३ । केदारलिंग रामेश्वरा । त्र्यंबका त्रिताप हारा । पावकाक्ष गदाधरा । शोक शमना भयंकरी । ४ । दश भुजा पंचवदना । द्विचरणा पद्मासना । बिंदु माधवा मृग नयना । धुंडीरूपा दंड पाणी । ५ । कालभैरवा कालांतका । कामारी भवमोचका । सोम सूर्याग्नी त्रिलोचका । भस्मधुळी सर्वांगी । ६ । महा मनिमुकुट धारणा । निलग्रिवामुक्त भूषणा । सृष्टी स्थीति प्रलय सदना । दक्षाध्वर

विध्वंशा तूं । ७ । तुझेपासुनी चराचर । रचिले ब्रह्मांडाचे थर । विर्धा वैकुंठ कैलास वर । निजइच्छे करुनिया । ८ । त्रिवर्गासी शक्त्या तीन । स्वयें केल्या त्वां अर्पण । कार्य करिती आपुलें जाण । तुझे सत्ते सर्वदा । ९ । या कारणें सर्वभावे । काम वासनासी त्यागावे । अखंड शिवगुरु भजावे । विदेहत्व होय प्राप्ती । १० । चाड धरुनी मोक्षाची । भीड सारावी जिवाची । विषय फळ भोगाची । आवडी खंडीजे । ११ । भगवद्भजनी लाविजे मन । करावा गुरु समाधान । प्रसादे ज्याचा निचखुण । अनुभवा घेईजे । १२ । गुरु असती बहुदरी । त्यासी नमावे सत्वरी । अनुभवाची खुण पुरी । जाणता क्वचित । १३ । गुरु असती घरोघर । ते जाणावे आखरीचें गुर । त्रिग भक्षिण्यासी तत्पर । असती सर्वदा । १४ । तैसे विषयसुख भोगिती । अन्य कर्मा कांहीं नेणती । भव भ्रमी अखंड फिरती । मुक्ती कैची त्या सापडे । १५ । आपणची फिरती मोक्षासाठीं । मग शिष्यास काशाची भेटी । वस्त्र घातिलें कुपाटीं । जीव तैसे शरण तया । १६ । काटीवरील वस्त्र काढिता । तंव चिंध्याची लागती हाता । त्याचे संगे विषय भोगिता । चिंध्या करी जिवासी । १७ । या कारणें पूर्ण विचार । करुनी धरावा मार्ग थोर । गुरु पाहृया करुणाकर । भवमार्गी तारितो । १८ । ज्याच्या दर्शनी निरसे माया । स्पर्श होता विदेही काया । ध्यानें बैसवी निजठाया । ब्रह्म-बाधे करुनि । १९ । ऐसा माझा देशिकानंद । ज्ञान देवोनी तोडितो बंद । स्वयें दाखवी आनंदकंद । भय मोचक सद्गुरु । २० । सद्गुरुचेनी प्रसादे । वाणी स्फुरली प्रमोदे । त्याची लिला विनोदे । कथन करितो श्रवण करा । २१ । पूर्वाध्यायीं निरुपण । अनुसयापतीस संजीवन । विष हरुनी अमृतपान । दिधले उमावरें । २२ । गदाधर नंदन बाळकृष्ण । सकळ विद्येमाजी निपुण । पौर्णिमेचा शुभानन । तैसी पूर्णता ज्ञानाची । २३ । आंब्यापासुनी दक्षिणेस । सायगांव असे तीन कोस । आला वस्ती यवनांचा घास । वृक्ष दाटी अच्युताची । २४ । तथोनी नैऋत्य दिशे । दीड कोसावरी ग्राम असे । दहीठाण नाम असे । वस्ती शुद्र जातीची । २५ । तेची क्षेत्रीचे जोशीपणा । सायगावीं कुळकर्णी भटपणा । उभय क्षेत्री वृत्ती साधना । पूर्वीच केली वडिलांनीं । २६ । ग्रामाधिकारी पांडे-

पणाचे । साल आलें लिहिण्याचें । तव गदाधर म्हणती वाचे । अनुसया पतीसी । २७ । बाळकृष्ण कमलाक्षा । अवतरलासी विरुपाक्षा । तुजला झाली पूर्ण दिक्षा । जमा खर्च लिहिण्याची ।२८। आतां आपुले गावाचा । करावा अदा खर्च साचा । प्रसंग आला परिक्षेचा । कुशलता दाखवावी । २९ । तंव म्हणे मी बाळक अज्ञान । मजला कैचे पूर्ण ज्ञान । परी तुमच्या प्रसादान । कार्या सिध्दी पावती । ३० । आपुला वर्धहस्त शिरीं । पांगुळ उलंघील गिरी । मुकिया फुटेल वैखरी । आपुल्या प्रसादानें । ३१ । स्वकरीं घेवोनी दप्तर । जनक जननी पदी शिर । ठेवोनी निघाले सत्वर । अनुसया नाथ । ३२ । जाउनी सायगावा भितरी । प्रवेश केला चावडीवरी । पाचारिले शेतकरी । पैसा वसूल घ्यावया । ३३ । पाटील शेतकरणारे जन । सत्वर आले धाऊन । येऊन सर्वांनें वंदन । केलें बहु आदरें । ३४ । तंव सकळासी अज्ञा केली । सरकाराची तहसील आली । मामुल माफक आपुलाली । आणोनी द्यावी सादर । ३५ । मग जी जी म्हणोनी । रुपये समर्पिती आणोनी । पावती घेती लिहुनी । प्रिय मानीती सर्वत्र । ३६ । या प्रकारे तहसील करुनी । सरकारासी दिधली पटउनी । रसीद पोहोंचलेची घेउनी । निज सदना निघाले । ३७ । मंदिरांत येउनी सत्वर । माता पितियाचे चरणावर । जोडुनिया उभय कर । वंदिले साष्टांगी । ३८ । कृपावचन बाळका दिधलें । प्रेमे पोटासी आलंगिलें । मुखकमळ चुंबिलें । क्षणोक्षणी धरुनी ।३९। म्हणती माझा राजहंस । उलंघील समुद्रास । नदीचा काय पाड त्यास । गुणवंत गुणनिधी ।४०। एक वसंत्सर पर्यंत । जमा खर्च लिहिला समस्त । शेवटीं हिशोब सरकारांत । समर्पिला अंत सालीं । ४१ । एवं परीक्षा दिधली । सर्व आश्चर्य करूं लागली । अल्प वय बुध्दी आगळी । बाळकृष्णाची सत्य पैं ।४२। सिंहाचे असती अज्ञान बाळ । परी महा गजासी होतीं काळ । ध्रुवासी दिधले अढळ । सुबुध्दी हरीनें । ४३ । लहान थोर काय प्रमाण । मुख्य बुध्दी आहे कारण । ईश्वर प्रसादावांचून । प्राप्ती नाहीं सर्वथा ।४४। एके दिवशीं पित्यानें नूतन । रेशमी धोत्र जोडा घेऊन । आले निजसदना कारण । बाळकृष्णासी बोलाविती । ४५ । अरे पाडसा तुजसाठीं । वस्त्र आणिलें

रेशीमकाठी । ऐसे बोलुनी धरिले पोटीं । अलंगिले प्रेमरसें । ४६ । बाळ-कृष्ण म्हणे अरण्य काठाचे । तुम्ही आणिले कभी मोलाचे । परी मी नेसेना त्याचे । परत करावे सत्वर । ४७ । ऐसे बोलून आपण । अधीक मोलाचे हटांतून । धोत्र आणिलें त्वरे जाऊन । दाखविले जननियासी । ४८ । हेचि धोत्र मज कारण । सत्वर यावे घेऊन । तंव म्हणती बाळा अगुण । आमची गोष्ट ऐकावी । ४९ । या वेळेस आमचें नेसावे । पुढें घेऊं थोर बरवे । तुम्ही परत करावे । ज्याचे त्यास हाटात । ५० । तंव म्हणे हेंचि घेईन । तुम्ही घेऊ यावे परतून । श्रवणी धरून वचन । काय बोलते झाले । ५१ । अरे अनुसयापती । किती मांगावे तुजप्रती । आमची गोष्ट प्रत्यया न येती । सुकुमार राजसा । ५२ । आम्हास मिळतील जैसे । घेऊन देणे तिच चरसे । परी तुम्हे मानवी कैसे । वाटतेरे बालका । ५३ । आपुल्या पराक्रमान । मिळवावे विविध धन । भोगावे वस्त्र भूषण । इच्छेनुरूप सर्वदा । ५४ । तंव म्हणे वचन असे सत्य । मज नसे वस्त्राचे अगत्य । दोन्ही वस्त्रासी करा परत । स्वकष्टानेची मिळवूं । ५५ । क्रोधयुक्त बालक अंतरीं । धोत्राचा त्याग करी । पाहुनी पिता सत्वरी । काय बोलता झाला । ५६ । कारे बाळा रुसलासी । कठोर वचन आम्हा बोलसी । कोणत्या गोष्टीचा क्रोध मानसी । आला असे पाडसा । ५७ । तुजला प्रिय वाटेल ते । धोत्र घेईजे नेसावयाते । आमचे वचन कोणतें । असत्य आहे बाळकृष्णा । ५८ । तंव म्हणे नको आतां । पुरे करा तुमची ममता । आजपासुनी कोणती सत्ता । करीना तुम्हावरी । ५९ । स्वतः पराक्रम करुनी । धन आणीन मिळउनी । इच्छेसारिखे वस्त्र भूषणी । परिधान करीन तें । ६० । वचन ऐकोनी जिर्वाण । उदकीं भरले नयन । स्फुंद आला हृदयीं दाटून । रुदन करूं लागले । ६१ । अरे बाळा सकुमारा । काय बोलसी आम्हा बरा । तुजसाठीं किती ईश्वरा । प्रार्थिलो दिननिशी । ६२ । नाना प्रकारचे नवस । पूर्वी केले देवतास । त्याचें फळ तूं आम्हास । प्राप्त जालासी सत्वरे । ६३ । नव मास जननी उदरीं । श्रम दिधले बहुपरी । कष्ट भोगोनी आजवरी । पाळिले तुजला । ६४ । त्याचा हा उपकार । फेडिलासी सत्वर । ऐसे बोलुनी वारंवार । अश्रुधारा लोटिती । ६५ । पिलें असती पाखरां । पंख

नसती लेकरां । माता आणोनी चारा मुखामाजी घालिती । ६६ । मग जों जों होय मोठें । तों तों शरिरा पंख फुटे । स्वतः उडोनी जाय नेटे । चरावया बाहेरी । ६७ । अज्ञान पाडस माझारी । मुखी धरुनी घरोवरी । नाना प्रकारे रक्षण करी । तया बाळकाचे । ६८ । जळामाजी कासवासी । लेकरें तान्हे असतिसी । दुग्धपान नसुनी त्यासी । वाचविलें दृष्टीनें ।६९। वृक्षावरी वानरी । दिननिशी वास करी । वत्स धरुनी उदरीं । पाळिती प्रेमयुक्त ।७०। कुकुटा तान्हे बहु असती । त्याजला भक्षिण्याप्रति । जननी पृथ्वी विदारिती । किटक सेविती बाळक । ७१ । या प्रकारे माता पालन करी । बाळक प्रौढ झाल्यावरी । माता पित्याचा त्याग करी । संग धरी विषयाचा । ७२ । जननी कष्टविले बहुत । त्याचा शोध नाहीं मनांत । वागविती आपुलें मत । मूढपणें सर्वदा । ७३ । तैसा तूं आम्हा झालासी । दूर करावया पाहासी । परिणाम न जाणसी । बाळकृष्ण आपुला । ७४ । ऐकुनी जनक वचन । सद्गदीत होउनी मन । दोन्ही कर जोडोन । प्रार्थना आरंभिली । ७५ । चातक पक्षासी माता व्याली । मग पाडसाते क्षुधा लागली । तेव्हां जननी दृष्टी न केली । जाणं आले पराकडे ।७६। इंदुच्या उदयासाठीं । आकाशा लाविती दृष्टी । माता पावली बहु कष्टी । परी जिवनत्व चंद्राकडे । ७७ । उभयाचे अधिष्ठान । मुख्य ईश्वर आपण । सुत्रधारावाचून । कार्य न करी भाउली । ७८ । अज्ञान संसृती माजी । देही म्हणोनी जीव गाजी । जाया सुत विषय काजी । गुंतती अहंकृतीमध्यें । ७९ । दृढ धरुनी अहंकार । म्हणताती आम्ही करतार । पालन शासनादि प्रकार । सांगती जनासी । ८० । परी अज्ञानी मानिती सत्य । जाणते समजती असत्य । मायिक ईश्वरी कृत्य । न कळे कोणासी । ८१ । आपण केवळ परब्रह्म मूर्ती । मी आहों जीव संतती । निज सत्तेवीण कार्य न होती । मुख्य कर्तृत्व आपलें । ८२ । बहु प्रकारे दृष्टांत । तुम्ही दिधले बाळकांत । परी उपमा पशु अज्ञानांत । ज्ञानी मानवा नसे हो । ८३ । अज्ञानी पशु समान । न कळे तया ज्ञानाज्ञान । तयासी उपमा देन । योग्य असे सर्वथा ।८४। तैसा नोहे तुमचा सुत । केवळ जाणा सिंहपूत । सुतिकापासुनी मुक्त । गर्सीकची होती ।८५। असो आतां क्रोध आपणासी ।

न याचा सत्य मानसी । बाळक अज्ञानाची रासी । नसे ज्ञान किंचित ।८६। अज्ञानाचे संबंधी । तदनुसार वर्ते बुध्दी । जाणत्यासि वार्ता कधीं । धरूं नये मनांत ।८७। मी अहंकाराची गोष्टी । तुम्हा बोलिलो बहु नेटी । ते दृढ धरुनी पोटीं । खेदासी प्रगटविले ।८८। अहंकारानें सत्ता मायेसी । सृष्टयादि कार्य होती कैसी । अभिमानाविण प्रपंचासी । कर्तुत्वादि नये हो ।८९। विषमतः गुणाची शकती । शक्तिविण गुण प्रगट न होती । या कारणें कार्य प्रकृती । भिन्नत्व असावे ।९०। जैसा एकची आहे राम । परी द्विस्थळीं स्थापिला ग्राम । वेगळाले करिती सुगम । उत्साह परवडी ।९१। ग्रामवासी असती जन । स्थळास्थळाची प्रीति धरुन । व्दैत वाढविती पूर्ण । उत्साहमाजी ।९२। आपला थाट विशेष व्हावा । पराचा रंगकमी असावा । म्हणोनी उभय स्थळी भजे देवा । व्दैतरूपे स्वभावे ।९३। व्दैत वाढले विशेष भजनीं । आनंदे गर्जती आपुलाले स्थानीं । परी नाम एकची वाणी । प्रगट होय सर्वांचें ।९४। दृष्टी झाली व्दैतपणें । तदनुसार कार्य जाणें । एकत्व सहजपरी नेणें । अज्ञान संबंधीं ।९५। नामरूप शरीराकृती । पुरुष एक भिन्न प्रकृती । राम एक असुनी मूर्ती । द्विस्थळीं स्थापिल्या ।९६। स्थळ मूर्ती भेदे करुनी । व्दैत मानेती अज्ञानी । म्हणोनी आपलाले स्थानीं । विशेष करितीं आनंद ।९७। तैसे या प्रपंचासी । व्दैत धरावे मानसी । मग आपुलाले कार्यासी । राहती तत्पर ।९८। गृह सुत दारा धन । संपादिती मानसन्मान । मुख्य अहंकार कारण । प्रपंचासी होतसे ।९९। म्हणोनी विशेष प्रिती आपली । आपणासाठीं परा करणें आली । परस्परे प्रीति वाढली । माय लेकरू दाराची ।१००। ऐकोनी बाळकाचें वचन । स्वाधीन झालें अंतःकरण । पोटासी धरिलें कवळून । क्षणोक्षणीं वदन चुंबी ।१। अरे राजसा आम्हासी । मायेनें वेढिलें मनासी । म्हणोनी संकल्प विकल्पासी । झाली प्रबळता ।२। मोह वाढला विशेष । विकार झाला अविशेष । संपृतिचा जीवापाश । आला असे स्वभावे ।३। मग चौऱ्यांशी लक्ष योनी । फिरविती ईश्वर देह देवोनी । पूर्वकर्म तयाचें पाहुनी । भोग देतो तदनुसार ।४। सुकृताचें उत्तम फळ । दुष्कृताचें दुःख प्रबळ । संचितासारखे सकळ । निर्मितो

प्रारब्धें । ५ । संचित कर्म दूर होतें । परी प्रारब्ध शेष उरते । तेंहि ज्ञानिया पुरुषातें । कांहींच नाहीं । ६ । सद्गुरुचा प्रसाद पूर्ण । ज्ञानाचा उदय होऊन । नाश पावे तम अज्ञान । जीवभ्रम दूर होतो । ७ । ज्ञानाग्नीनें संचीत कर्म । जळोनी होती सर्व भस्म । क्रियमान वंध्यासंगम । निर्फळ होती जैसे । ८ । आतां उरलें प्रारब्ध । तें जाणावे पट दग्ध । लोका दिसती संबंध । परी पांघरु नयेती । ९ । या प्रकारे कर्मा वेगळा । जीव झाला जाणोनी मोकळा । अखंड ब्रह्म सोहळा । भोगी गुरुप्रसादे ।११०। गुरु तोचि ईश्वर पूर्ण । ईश्वर गुरुसी नाहीं भिन्न । उभय मिळोनी ब्रह्म आपण । शुध्द जीव जाणावा । ११ । उपाधी संबंधी भिन्नता । निरुपाधी ऐक्यता । उभयासी कारणता । ब्रह्म ईश्वर जाणावे ।१२। या प्रकारे चराचर । जाणोनी धरावे निज सार । म्हणजे भव सागराचे पार । सद्गुरु करितो । १३ । ऐकोनी दिव्याची वाणी । बोध बाणला अंतःकरणीं । साष्टांग घातिले चरणीं । कृपावर संपादिला । १४ । मग दुसरे दिवशीं । निघाली सवारी पैठणासी । प्रवेश करुनी क्षेत्रासी । नाथसदनी पावले । १५ । उतरुनी देवळांत । लोक दर्शना येती संत । पुसती कोठील कोण गृहस्थ । कोण्या अर्थी आले हो । १६ । तंव म्हणती आम्ही दूरचे । योगेश्वरी क्षेत्राचे । अंबापुरी गृह आमचें । स्थापिलें वडिलांनीं । १७ । त्यांचे नाम गदाधर । मी आहे त्यांचा कुमार । प्रवासा निघालों बाहेर । देश पाहवयासी । १८ । फिरत फिरत आलों येथ । वार्ता ऐकिली महा समर्थ । सत्पुरुष एकनाथ । त्यांचे दर्शन घ्यावे । १९ । म्हणोनी दर्शनासाठीं । आलों येथवरी नेटी । संत सज्जनी कृपादृष्टी । व्हावी दासावरी । १२० । म्हणजे जड जीवाचा । उध्दार होईलजी साचा । अखंड लाभ मोक्षाचा । प्राप्त होईल आम्हासी ।२१। जीव ब्रह्मरुप झालयावरी । मग कोणते कर्माची उरी । न राहनी पुरुपार्थ चारी । फलद्रुप तत्तप्रसादे । २२ । या कारणें दर्शनाची चाड । सोडिली कर्माची भीड । निर्मळ झालो उघड । रक्षावे दासासी । २३ । तुमची जरी कृपा होईल । इच्छित कार्य सकळ । मज कारणें अनुकूल । राहतील सर्वदा । २४ । ऐसे संत कृपेचे महिमान । न कळे ब्रह्मादिका लागून । सकळ देवतागण । श्रुतिमंद झाल्या ।२५। माझी

पाभराची काय काहणी । वेदासी न बोलवे वाणी । परी कृपेचा केवळ धनी । दिनाचा सत्य पैं । २६ । ऐसे बोलोनी वंदन । केले नाथालागून । पावन करी अहो दिन । दास मी तुमचा । २७ । अज्ञान बोबडा बोली । माता पिता प्रिय मानिली । तेवि जे प्रर्थना केली । प्रिय करा श्रीनाथा । २८ । देश सोडोनी परदेशो । आलों आतां जगदेशी । तुम्हा कृपा नये कैसी । देवाधि देवा । २९ । मज करावे अमर । ठेवोनी कृपेचा कर । नेउनी घाला पैलपार । पदहीन पांगुळा । १३० । या प्रकारे केली प्रर्थना । घातिल्या तीन प्रदक्षणा । विश्रांतीस्तव बैसले आगणा । सभामंडपामाजी । ३१ । तेथुनी आपलें बिऱ्हाडांत । येउनी राहिले निवांत । सूर्य उदय पर्यंत । निद्रस्थ झाले । ३२ । सूर्य उदय झाल्यावरी । एक ग्रामवासी रोजगारी । ब्राह्मणवर्णाधिकारी । दर्शना आला नाथाच्या । ३३ । दर्शन घेवोनी बाहेरी । मग प्रदक्षणा करी । नाथ नाथ म्हणोनी उच्चारी । बैसला स्वानंदे । ३४ । उठोनी गृहस्थ सत्वर । आला बाळकृष्णाच्या समोर । म्हणें हा ब्राह्मण दिसतो थोर । परी वय बहु अल्प असे । ३५ । तेज दिसे सूर्यासारखे । पाहुनी मन झालें सुखे । न उचंबळती दु:खे । आनंद वाटे बहुत । ३६ । येवोनी समीप चरणी । वंदन केले गृहस्थानी । विनवी कर जोडोनी । वचन माझे श्रवण करा । ३७ । हे महाराज माझे सदना । आपण आज यावे भोजना । पावन करावे दिना । हेचि इच्छा दासाची । ३८ । उत्तम आहे म्हणोनी । उत्तर दिधले तयानी । गृहस्थ गेला सदनी । सत्वर स्वानंदे । ३९ । तंव स्नान संध्या देवार्चन । केलें नाथाचें पूजन । प्रदक्षणा घालून । स्वतः बैसले । १४० । मध्यान काळ भरते वेळीं । पाचारण आलें देउळी । म्हणें भोजनासी मंडळी । सिध्द झाले सर्वत्र । ४१ । याकारणें आपणासी । यजमानानें सवेगी । पाचारावे म्हणोनी आम्हासी । पाठविले सत्वर । ४२ । ऐकोनी विप्राचें वचन । निघाले भोजना आपण । गृहस्थाचे सदनी प्रवेशून । पाद प्रक्षाळिले । ४३ । येवोनी गृहस्थ सत्वर । बैसविले पाटावर । मस्तक चरणावर । न्यसिता झाला । ४४ । षोडशोपचार पूजा करुनी । मग बैसविले भोजनी । तांबुलादि समर्पुनी । प्रार्थिता झाला । ४५ । हे महाराज कुबळ्यावरी । गंगा आली सत्वरी । किं अभाग्याचे घरीं । प्र.९३

झाली कामधेनु ।४६। दीन दरिद्री यांसी चिंतामणी । सांपडला असे अग्र-यत्नी । परिस निघाला सदनी । मृत्तिका उकरता ।४७। कल्पवृक्षाचें बीज । येऊनी पडलें सहज । त्याचा अंगणी वृक्षराज । प्रगटता झाला । ४८ । रोगे वेष्टिला नर । प्राणांत झाले शरीर । अमृत येवोनीं मुखीं सत्वर । अकस्मात पडियेलें । ४९ । महा पातकी पामराते । मोक्ष येवोनी भेटला त्यातें । कीं वंध्या नारी प्रसुते । पुत्र झाला राजहंस । १५० । या प्रकारें आमची गती । आपण भेटला ब्रह्ममूर्ति । अनंत जन्माची सुकृती । आज आले फळाला ।५१ । म्हणोनी एवढा लाभ । साक्षात भेटले सांभ । महा थोर दिन शुभ । उगवला कनकरूपीं । ५२ । महाराज संपत्ती बहुत । परी नाहीं पोटीं सुत । त्यावाचुनी प्रपंचांत । न्युनता दिसे । ५३ । ऐकुनी गृहस्थाचे वचन । अक्षदा नारळ मंत्रून । उभयतास समर्पून । बोलते झाले । ५४ । आज पासुनी एक संवत्सर । भरता प्राप्त होईल कुमर । तुमचा करील उध्दार । त्रिभुवनामाजी । ५५ । तंव सत्वर नरनारी । साष्टांग लोळती चरणावरी । कृपाहस्त मस्तकावरी । ठेविला दयाळे । ५६ । एक दुशाला पांघरुनी । शतमानमुद्रा देवोनी । लागले उभयतां चरणी । क्षणोक्षणी आलिंगिले ।५७। आतां आपुली सवारी । केव्हां येईल दासाचे मंदिरीं । म्हणोनी उभयतांनीं नेत्रीं । आश्रुधारा लोटलिया ।५८। तंव म्हणती लवकर । एक भरता संवत्सर । येउत सत्य धरावा धीर । नाथ दर्शना कारणें । ५९ । उठोनी महाराज निघाले । देवळामाजी प्रवेशले । तीन दिवस राहिले । नाथासमीप । ६० । मग चतुर्थ दिवशीं । गृहस्थ आला दर्शनासी । तंव म्हणती गमनासी । मुहूर्त आज चांगलें ।६१। ऐकोनीया वचन । तयारी केली संपूर्ण । समागमेसी पायी देऊन । मार्गस्थ केले । ६२ । तीन कोसपर्यंत । आपण आले वाटेलावीत । उभा राहुनी महाराजाते । वंदिले चरणासी । ६३ । हे महाराज दासावरी । गंगा यावी सत्वरी । ऐसे बोलोनी माघारी । परत आला गृहाते । ६४ । जवाना समवेत महामूर्ती । त्वरीशी आली अमरावती । पावले निज गृहा-प्रती । जनक जननीसी वंदिले ।६५। आलिंगुनी बाळकाप्रती । माता पिता प्रिये बोलती । काय तुमी गुणकीर्ति । वर्णावी राजसा । ६६ । ऐकोनी

प्रिय वचन । बोलते झाले आपण । तुमचे प्रसादाविण । प्राप्ती नाहीं सुखाची । ६७ । मुख्य आपला अभय कर । राहिला माझे मस्तकावर । म्हणोनी झालों अमर । प्रसादे तुमच्या । ६८ । मी गेलों दूर देशावरी । खेद वाटला तुम्हा अंतरीं । परी देश नोहे होतो घरीं । ऐसे मज झाले । ६९ । हे बाळका तुज कारणें । कधीं होणार नाहीं उणें । इच्छिशील तें संपूर्ण । प्राप्त होईल सर्वदा । १७० । ऐसा मिळवोनी कृपावर । मस्तक ठेविलें चरणावर । वंदिलें वारंवार । ब्रह्मानंदे करुनी । ७१ । या प्रकारे लिलारस । कथन केला सुरस । पुढील अध्यायीं ब्रह्मरस । पावेल उदयाते । ७२ । ज्या ब्रह्मज्ञानें करुनी । मुक्त झाले शुकादि मुनी । त्याच्या प्रसादे ज्ञानी । जड जीव उध्दारले । ७३ । श्रीमत्सच्चीताखंड मूर्ती । देशकानंद सद्गुरु निश्चिती । शेष म्हणे माझी मती । तव चरणी दृढ वसो । ७४ । इतिश्री देशिकलीलामृत । पुराण नाहीं कोणते संमत । नुतन कथा सज्जन परीसोत । चतुर्थोध्याय गोड हा । ७५ ।

# अध्याय ५ था.

। श्रीगणेशायनमः । श्रीसरस्वतयेनमः । श्रीगुरुभ्योनमः । जयजयाजी सदाशिवा । जयजयाजी उमाधवा । जयजयाजी पूर्ण भावा । प्रगट करी भक्तासी । १ । जडाजड विलक्षण साक्षी । महा संकटापासुनी रक्षी । जेवी माता धरी वक्षी । सांभाळसी निज दासा । २ । षड्गुण ऐश्वर्याचा दाता । षड् विकाराचा प्रस्ता । षड् रिपुने शास्ता । तुजविण कोण असे । ३ । ब्रह्मांड संकलपानें केलें । नानापरी तया रक्षिले । शेवटीं विलया नेलें । ऐसा प्रतापी तूं एक । ४ । तुझी करुणा जयावरी । तोचि कृतार्थ संसारीं । अखंड साम्राज्य करी । कांही न्यून तया नसे । ५ । असो पूर्वील अध्यायाचे अंतीं । एकनाथाचें स्तवन प्रीति । सावकाराचे बायकोप्रति । वर दिधला बाळकृष्णे । ६ । गृहामाजी येऊन । संपादिलें आसीर्वचन । माता पित्याची सेवा करून । कांहीं दिवस राहिले । ७ । कोणे एके दिवशीं । इच्छा झाली बाळकृष्णासी । कांहीं तरी व्यापारासी । आरंभ करावा । ८ । जवळ कांहीं रुपये होते । ते दिधले लोकाते । त्याजपासुनी

धान्याते । घेऊं लागले । ९ । घाडीनें कोणास देती । कांही विक्रय करिती । कांहीं वस्तू गहाणें घेती । व्याजावर वेगळे ।१०। ऐसा व्यापार करुनी । द्रव्य अपार मिळवोनी । अलंकार वस्त्र भूषणी । नाना:ारी लेत असे । ११ । तंव एके दिवशीं । आपण गेले ग्रामासी । तेव्हां रात्रीचे समयासी । डाका आला असे । १२ । तस्करे मशाली लावोनी । सकळ कडताळे फोडोनी । गृहामधील सर्व जिंदगानी । नेते झाले चोरटे ।१३। गृहांतील मनुष्य सकळ । लपोनी बैसले तात्काळ । कोणी सापडे तयास घायाळ । करुनी टाकिले । १४ । सूर्य उदयपर्यंत । गृह लुटिले समस्त । काहीं न ठेविता त्वरित । पळोनी गेले वनासी । १५ । दुसरे दिवशीं प्रथम प्रहरी । बाळकृष्णाची आली स्वारी । तंव देखिले गृहांतरी । सकळ नेलें चोरानें ।१६। लोकांचे गहाण वस्तूसी । काय द्यावे म्हणती त्यासी । ते येतील मागावयासी । काय सांगावे तयाते । १७ । दुसरे दिवशीं गृहांतलें । कांहीं गुप्त धन होतें ठेविलें । तें काढुनी ज्याचें त्यास दिधलें । मुक्त झालें आपण । १८ । उपरती झाली मनांत । हें सारे नाशिवंत । काय संपादुनी अशाश्वत । दुःखासी कारण जे । १९ । मनांत करिती विचार । त्यागावें गृह द्वार । पाहुनी स्थळ सुंदर । अनुष्ठान करावे ।२०। ऐसे चिंतुनी अंतरी । निघाले गृहा बाहेरी । जाउनी मुकुंदराज विवरी । वंदन केले पादुकेला ।२१। चरणीं वाहती जयंती । वानगंगेसी मिळती । बुटी नाथा खालती । संगमासी स्नान केलें । २२ । स्नान संध्या करुनी तेथ । आले मुकुंदराज गुंफेंत । आसन घालुनी स्वस्थ । पूजा करिती झाले । २३ । पूजा करुनी समस्त । उभे राहिले जोडोनी हस्त । प्रार्थना केली बहुत । त्राही त्राही म्हणोनी । २४ । वंदन करुनी साष्टांगेसी । विनवनी ऐका स्वामी ऐसी । अनुग्रह व्हावा दासासी । हेचि मागणें स्वामीला ।२५। ऐसे बोलोनिया गोष्टी । क्षणभर लाविली दृष्टी । ध्यानीं आणिला समेष्टी । चंद्रचूड स्वामी जो । २६ । शंकराचार्य अवतार । ज्यानें ख्याती केली अपार । भक्त नेले भवाब्धी पार । ज्ञान बोधे करुनिया । २७ । महा अरण्य कठीण । तेथें दरी एक कोरून । विवेकसिंधु नामाभिधान । ग्रंथरचना केली असे । २८ । अठरा दिवसपर्यंत । जयत्पाळासी बोध

समस्त । करूनी रचिला साग्र ग्रंथ । अष्टादशाध्याई । २९ । त्या ग्रंथाचें नित्य पारायण । अखंड मांडिलें अनुष्ठान । अणिक करिती उपोशन । महा कठीण मांडिलें ।३०। तंव आले तीन दिवस । दोन प्रहर होता रात्रीस । महा भुजंग निघाला श्याम । पाहिलें दृष्टीनें ।३१। प्रकाश पडला बहुत । दीप को ऐसी आला आंत । कोण लाविलासे मनांत । विचार करूं लागले । ३२ । तो भुजंग महा दारुण । मुखामाजी खडा ठेवुन । हळूं हळूं सरकून । फिरूं लागला । ३३ । फिरत फिरत येतां जाण । तंव पाहिले नेत्र उघडोन । तो महा सर्प कठीण । शब्द करूं लागला । ३४ । तंव नेत्र झाकून । हृदयीं ध्यान करून । वाचे हर हर बोलोन । तैसेची निद्रिस्थ झाले । ३५ । फडी कतुनी अंगावरी । फिरूं लागला गर्जना करी । भयाभित होउनी बाहेरी । पळुनीया जावे ।३६। बहुत केले छळन । परी नाहीं उघडिले नयन । पाहुनी दृढ अंतःकरण । गुप्त झाला भुजंग तो । ३७ । ऐसा रात्रीं झाला वृत्तांत । सूर्य पावला उदयांत । स्नान संध्या पूजा करीत । बैसले निर्भय ते । ३८ । मग तीन दिवसानंतर । सुपासारखे विंचू थोर । नांग्या भयानक फार । जवळ येऊं लागलें । ३९ । ते पाहुनी तेक्षणीं । मुद्रा लाविली नयनीं । श्रीशंकराचे ध्यानी । मन लाविलें ते वेळा । ४० । शंभर विंचू सुपापरी । चढले तेव्हां अंगावरी । फिरुनीया गात्र मारी । अदृष्य झाले ।४१। अंतरीं म्हणती हें दोन । देवानें पाठविलें विघ्न । आतां तिसरियान । काय पाठवितो न कळे । ४२ । असो मर्जी गुरुची । पाहतां दृढता मनाची । जरी भक्ती असेल साची । तरीच कृपा होईल । ४३ । नित्य चालविला क्रम । मांडोनी विषय काम । अंतरीं स्मरे सदा नाम । कधीं विस्मर पडेना । ४४ । तंव अठरावे दिवशीं । दोन प्रहर मध्यरात्रीसी । महा व्याघ्र अक्रोशी । धाउनी आला तात्काळ । ४५ । मोठी आरोळी देऊन । बैसला जवळ येऊन । विक्राळ मूख पसरून । हस्त उगारिता झाला । ४६ । ऐसें पाहुनी त्वरित । बैसले हृदयीं ध्यानस्त । संरक्षण करी किंवा अंत । कोणतेंही घडावे । ४७ । ऐसा दृढ अंतरीं भाव । मन मांडिलें सदैव । व्याघ्ररूपाचा अभाव । झाला असे ते काळीं । ४८ । त्रिविध रूप दाविलें आम्हां । हरली सकळ भयचिंता ।

प्रत्यक्ष भेटसी उमानाथा । हीच इच्छा दासाची ॥ ४९ ॥ तुझ्या भेटीची इच्छा धरून । मांडिलें म्या अनुष्ठान । करावें मनोरथ पूर्ण । कैलासनाथा पशुपते । ५० । हा प्राण जावो जरी । अथवा राहो शरीरीं । निर्धार माझा सिध्द करी । ही इच्छा तुझी असे । ५१ । मी तरी बहुत अज्ञान । कोणते गोष्टीचे नाहीं ज्ञान । यास्माठीं तुझे चरण । मुढपणें धरिलें म्यां । ५२ । अनंत जन्माचा मी पापी । म्हणुनी पिडलों त्रिविध तापी । आतां दावी निजस्वरूपी । ज्ञानदृष्टी करुनिया । ५३ । प्रपंच दुःखाचा सागर । जन्मासी आलों वारंवार । नानापरी भोगिले अघोर । बहु पिडित जाहलों मी । ५४ । गर्भामाजी नवमास । नर्की बुडालों बहुवस । कीटकें तोडिलें पिंडास । जाच किती सांगावा । ५५ । जठराग्नींत पोळलों बहुत । त्या तापासी नाहीं अंत । बाहेर पडतां आकांत । खाण्यासाठीं करितसे ॥ ५६ ॥ येणें परिचय मजला । ताप आले अनुभवाला । म्हणोनी आतां चरणाला । मिठी दृढ घातिली । ५७ । ऐसें स्तवन करितां । गेली शरीराची अहंता । दया आली असे संता । काय केलें ते वेळीं । ५८ । अतीत संन्यासी होऊन । दंड कमंडलु हातीं घेऊन । नारायण शब्द उच्चारून । गुंफेमाजी पावला । ५९ । आसन घालुनी सत्वर । मस्तक ठेविलें चरणावर । त्यानें उचलुनी वरचेवर । आलिंगन दिधलें । ६० । कर जोडोनी स्वामीप्रति । प्रार्थना आरम्भिली निश्चिती । आपली जन्मभूमि कोणती । सांगा सत्य यतीवर्या । ६१ । तव प्रिय वचन ऐकोनी । काय पुससी आम्हा लागुनी । आमचा वास त्रिभुवनीं । जन्म मरण आम्हा कैचे । ६२ । आतां जातों स्नानासी । क्षुधा लागली प्राणासी । कोठें जावें भिक्षेसी । शांत करावें जीवाला ॥ ६३ ॥ म्हणजे जप तप साधन । त्यासी कांहीं न येती विघ्न । शरीर होतें संरक्षण । सर्व कार्य साध्य होती । ६४ । असो तुम्ही कोठें राहतां । कोण तुमचे माता पिता । कोणते कार्यास्तव करितां । अनुष्ठान दुर्धर । ६५ । वय तुमचें बहु लहान । कठीण मांडिलें आचरण । याचें काय असें कारण । सत्य सांगा मजप्रती ॥ ६६ । काय तुम्हासी आहे संकट । हें सर्व बोला स्पष्ट । परी आतां ऐकावी गोष्ट । हितार्थ तुमच्या सांगतों

। ६७ । आधी करावा प्रपंच सारा । संपादावी धन दारा । विषय भोगावे अपारा । पुन्हां इच्छा न व्हावी । ६८ । जेवी मिष्ठान्न भक्षिलें । तत्क्षणींच वमन जाहलें । तया वमना न सेविलें । मानव जनी । ६९ । तैसें विषय भोगुनी सोडावें । पुन्हां त्यासी न अंगीकारावें । मग सद्गुरुसी शरण जावें । म्हणजे परमार्थ साधतो ।७०। प्रपंच ना परमार्थ । नाहीं साधिला कांहीं स्वार्थ । जन्मोनी प्राणी व्यर्थ । जाय अधःपाता । ७१ । यासाठीं निश्चय धरून । अंतरीं स्थीर करावें मन । सर्वकाळ ईश्वरभजन प्रेमयुक्त करावें । ७२ । प्रेमयुक्त भजता प्राणी । त्यांचे सारिखा श्रेष्ठ कोणी । न दिसे जाणा त्रिभुवनीं । सत्य सत्य वचन हें ।७३। भजनानें नारद व्यास । भजनानें शुक पराशरास । भजनानें ध्रुव बाळास । अढळ पद मिळालें । ७४ ज्ञानरहित मूढ भजनान । चित्ताचे होतसे मळक्षालन । पुढें ज्ञान प्राप्तीसी कारण । निश्चयरूप होतसे । ७५ । चित्त शुध्दी दृढ निश्चय । मनें त्यागिले विषय । त्यासी राजयोग अक्षय । प्राप्त होईल सत्य पैं । ७६ । यथार्थ ज्ञान झालीयावरी । त्यासी नाहीं येरझारी । तो न लिंपे संसारीं । मृगजळ प्राय दिसतो । ७७ । प्रपंच करूनी अलीप्त राहती । अलीप्तपणें विषय भोगिती । त्यासी नाहीं यातायाती । वचन सत्य जाणावें । ७८ । यास्तव तुम्ही प्रपंच करावा । धर्मार्थ काम साधावा । मग मोक्षमार्ग धरावा । हेंचि सार्थक जन्माचें । ७९ । प्रपंच सोडोनी वनीं गेला । निवांत स्थळीं जाउनी बैसला । परी अंतरी चिंतन करूं लागला । गृहाचें कैसें होईल ।८०। मग कांहीं सुचेना जप ध्यान । अखंड विषयाचें चिंतन । व्यर्थ गृह त्यागिलें म्हणोन । मनामाजी खेद करी ।८१। यासाठीं कोणते कर्माची । इच्छा पूर्ण करावी साची । पुन्हां वासना होण्याची । उर्ता ठेवूं नये । ८२ । वासनेकडून संसार । जीवासी जन्म वारंवार । दुःख मागणें अपार । वासनेकडूनिया । ८३ । मुख्य वासना दूर करावी । अहंता सकळ गिळावी । इंद्रिय भजनीं लावावी । सर्वदा श्रीगुरुकृपया । ८४ । येणें परी साधनीयुक्त । तोचि जाणावा जीवन्मुक्त । ऐसें बोललें महा सुक्त वेदशास्त्र प्रमाण जें । ८५ । तंव ऐकोनीया वचन । बाळकृष्नानें

धरिले चरण । महाराज उपदेश करून । तारावे दिनाला । ८६ । आपण संन्यासी वेश धरून । आम्हासी ठकवितां येऊन । सर्प वृश्चिक व्याघ्र होऊन । भय दाविले दासासी । ८७ । परी आतां तुम्हाविण । नाहीं ठेवणार पंचप्राण । दाखवावें अवतरण । पूर्ण स्वरूपाचें । ८८ । तुम्ही धरिले बहु वेश । परी म्या ओळखिले निःशेष । आतां चोरू नका दासास । कृपाळूपण आपुलें । ८९ । पूर्व कर्माचें पुण्य कांहीं । आज उदयासी आले पाही । म्हणोनी लाभ जोडला देहीं । निज दर्शनाचा ।९०। आतां करावें कांहीं स्तवन । तरी नाहीं देहाचें भान । मन होऊं पाहे उन्मन । तेव्हां ध्यान कोठें राहिलें ।९१। जैसा खडा लवणाचा । उदकीं मिळे जेवी साचा । तैसा जीव शिवाचा । जाहला अभाव । ९२ । तंव स्वामी संतोषुनी । दिव्य प्रकाशिले नयनीं । साक्षात शिवरूप धरुनी । सिंहासनीं बैसलें । ९३ । दशभुज पंचवदन । भाळीं चन्द्रशोभायमान । जटा रुद्राक्ष धारण । विभूति अंगीं चर्चेली । ९४ । त्रिशूळ डमरु चर्म वस्त्र । सूर्य सोमाग्नी त्रिनेत्र । वामांगी शक्ती पवित्र । गंगा शिरीं धरिली असे । ९५ । ऐसी देखोनी शिवमूर्ति । ब्रह्मानंदीं बुडाली चित्तवृत्ती । षोडशोपचारे पूजा निश्चिती । प्रदक्षिणा घातल्या । ९६ । कर जोडोनी सन्मुख । उभे राहिले देख । स्तवनकरितां सुख दुःख । विसरली देहस्थीति । ९७ । एकरूप वृत्ती जाहली । निर्विकल्प समाधी लागली । सात्विक भाव उमटली । स्वेद कंपादिक । ९८ । तंव शंकर दिधले आलिंगन । मग सावध झाले बालकृष्ण । शिवानें पोटासी धरून । हंसमंत्र उपदेशिला । ९९ । बारे तूं माझें करी ध्यान । नित्य माझेची पूजन । मुखीं करावें भजन । सर्वदा माझेची । १०० । माझे रूप सकळ जग । माझे रूप सकळ भोग । माझे रूप सकळ योग । सत्य जाण बालका । १ । माझी प्रत्यक्ष विभूति । तूंच आहेस दिव्यमूर्ति । आतां होईल तुझी कीर्ति । त्रिजगतीं न समाये ।२। ऐसा वर संपादुनी मस्तक ठेविलें चरणीं । तंव कृपाहस्त ठेवोनी । बोलते झाले । ३ । गंगेच्या नाभी तिरीं । नंदीग्राम एक नगरी । तेथें शुकानन्द वास करी । त्याचें दर्शन घेईजे । ४ । तो महा थोर सत्पुरुष । केवळ सुदामाचा अंश । अष्टांगयोग

ज्ञान विशेष । पूर्ण असे तयाला । ५ । सत्यवादी दृढ व्रत । निरापेक्ष ज्याचें चित्त । सहज वृत्ती असे शांत । धैर्य अगाध बुध्दीसी । ६ । सर्वा-त्मता असे अंगीं । तैसा नाहीं पुरुष जगीं । ब्रह्मानंद चित्त भोगी । सदा स्मरण करी माझे ।७। त्यासी शरण जाउनी । युक्त व्हावें योगसाधनीं । ज्ञान स्थिरेल अंतःकरणीं । प्रसादे ज्याच्या । ८ । माझे स्वरूप तोचि आहे । माझें ज्ञान तेथें राहे । माझी कृपा लवलाहे । सकळ प्राप्ती होईल । ९ । आतां आम्ही निजस्थाना । जातो म्हणें कैलास राणा । दृढ लागता चरणा अदृष्य झाला । ११० । नेत्र झाकुनी न्हृदयांत । ध्यानीं आणिला उमानाथ । सायुध मूर्तिमंत । अंतरयामी प्रगटली । ११ । अखंड ध्यान लागलें । चित्त तदाकार झालें । देहभान हरपलें । प्रसादे ज्याच्या ।१२। गृहीं काय झालें वर्तमान । त्याचें कांहीं नसे स्मरण । अखंड लागलें ध्यान । अचिंतानंद स्वरूपाचें ।१३। तंव माता पिता अप्तजन । म्हणती बाळकृष्ण गेला उठोन । अद्यापी त्याचें वदन । पाहिलें नाहीं सत्य पैं । १४ । कोठें पाहवें तयासी । अंत नाहीं दुःखासी । काय करावे उपाय त्यासी । उदास वाटे दाही दिशा । १५ । घरोघरीं जाउनी पुसती । बाळकृष्ण देखिला काय म्हणती । नेत्रीं आश्रुधारा गळती । आक्रोश करिती एकसरे । १६ । कीं कोठें दिधला प्राण । कीं काय केलें वीष भक्षण । कीं वनामाजी जाऊन । तपश्चर्या मांडिली ।१७। कोठें न लागे तयाचा शोध । देवा काय केला अपराध । म्हणोनी एवढा क्रोध । आम्हावरी मांडिला । १८ । आम्ही अपराधी बहुत । तेव्हांची मांडिला प्रळयांत । अर्थ प्राणासहित । नाश घडू आला असे । १९ । अठरा दिवस पर्यंत । शोध घेतला गांवांत । आणीकही अरण्यांत । बहु स्थळीं धुंडिलें । १२० । अन्न उदक त्यागुनी । दुःखीत बैसले सदनी । तरमळीत अंतः-करणीं । चिंतीस्थ झाले । २१ । तंव बाळकृष्ण समाधी सारून । पुस्तक ठेविलें बांधून । विवराबाहेर येऊन । उतरले खालती । २२ । जयंतीमध्यें जाऊन । स्नान संध्या करून । गुंफेमाजी येऊन । पूजा केली स्वामीची । २३ । तीर्थ प्रसाद घेतला न्हृदयीं । मस्तक ठेविलें प्रभुपायीं । निरोप द्यावा माझे आई । गृहाकडे जावया । २४ । माता पिता सकळ जन ।

भजसाठीं त्यागतील प्राण । ऐसें अंतरीं चिंतून । वंदन केलें पादुकेसी ।२५। अन्नावाचून शरीर । बहु झालें जर्जर । अंतरीं आनंद थोर । त्याजमध्यें निमग्न बहु ।२६। हळूं हळूं चालत । तेव्हां आले ग्रामांत । ग्रामवासी जन समस्त । धाउनीया भेटती ।२७। कोणी जन गृहाप्रती । पुत्र आल्याची वार्ता सांगती । ऐकोनी माता पिता उठती । धावत येती पाहवया ।२८। जनक जननी देखोन । केले साष्टांग नमन । कंठीं मिठी घालून । आनंदाश्रु लोटिती ।२९। सकळ मिळोनी गृहाप्रति । येउनी बाळकृष्णासी पुसती । इतके दिवस कोठें वस्ती । केली तरी सांगावो ।१३०। ऐकोनी केलें हस्य वदन । मग सकळ सामुग्री करून । ब्राह्मणासी आमंत्रण देऊन । अनुष्ठान संपविलें ।३१। मुकुंदराजासी अभिषेक केला । शोडशोपचारे पूजिला । नैवेद्य ब्राह्मणासी अर्पिला । संतुष्ट केले सर्वत्र ।३२। मंत्राक्षदा देउनी । विप्र पावले आपुलाले सदनी । आनंद न माय त्रिभुवनीं । संतुष्ट झाले सकळ ।३३। ब्रह्मानंद पूर्ण रुपा । अखंड ध्याती निज स्वरूपा । दूर करिसी त्रिविध तापा । माय बापा तूं एक ।३४। आतां पुढील अध्यायांत । कथा होईल सुरस बहुत । श्रोते ऐकावे सावचित्त । मनोवृत्ति करूनीया ।३५। देशिकानंदा यतीवर्या । सद्गुरुनाथा विश्राम सूर्या । वदविसी आपुली गुणचर्या । शेष म्हणे मज हाती ।३६। इतिश्री देशिकलिलामृत । पुराण नाहीं कोणते संमत । नूतन कथा सज्जन परिसोत । पंचमोध्याय गोड हा ।१३७।

# अध्याय ६ वा.

। श्रीगणेशायनमः । श्रीगुरुभ्योनमः । जयजय अनंत विहारा । जयजय करुणासागरा । भक्तजन त्रिताप हारा । नामा नामा तूं एक ।१। चिरभद्र सदानंदा । प्रजापती मूळकंदा । हिरण्य गर्भाचा प्रमोदा । प्रगटविसी स्वानंदे ।२। सहस्त्राक्षाकृती वाक्षा । गिरोप्रिया भुजंगभूषा । अव्यक्त मोचका अमपाशा । अविनाशी काळत्रयी ।३। अपवर्गा तारक नामा । न कळे गुण निगमागमा । कोण करील त्याची सीमा । अगाध महिमा

न कळे । ४ । परमेश्वरा याची मती । तरीच होईल ग्रन्थ पुरती । नाहीं तरी युक्ती खुंटती । म्हणोनी स्तवन मांडिलें । ५ । स्तवन तरी किती करावें । कोणतें नाम मनीं स्मरावें । अनन्यभावें शरण जावें । कोणत्या दैवतेंसी । ६ । आतां पुरे स्तवन । एक श्रीगुरुचे चरण । भक्तिभावें अनुदिन । वंदुनी स्मरावें । ७ । यापरते साधन नाहीं । म्हणोनी त्यांच्या पायीं । ठेविली त्यां निज डोई । कृपावर मायाबमा । ८ । पूर्वीच पूर्ण झाला मज । म्हणोनी वाणी स्फुरली सहज । देशिकानंद महाराज पूर्ण-ब्रह्म प्रतापी । ९ । असो पूर्वील प्रकरणीं । बाळकृष्ण गेले उठोनी । मुकुंद राजापासी जाउनी । प्रसन्न केले त्याला । १० । आतां श्रोते सावकाश । बुध्दीचा करावा प्रकाश । एकरूप कथा निःशेष । ऐकावी प्रेमबळें । ११ । तरीच कांहीं कथारस । प्राप्त होईल श्रोतियांस । नाहीं तरी सोनार वायुस । नळीमाजी फुंकिले । १२ । पालथे कुंभावरी पाणी । तैसे शब्द ओतिले श्रवणीं । मग अर्थाची काय सिराणी । प्राप्त होईल तुम्हाते । १३ । यासाठीं विषयचिंता । क्षण एक दूर करितां । सर्व कथा रस येईल हाता । आपेआप श्रवणानें । १४ । बाळकृष्ण नित्यनियम । विवेकसिंधु वाचिती अगत्य । शिवभजन नेमानें सत्य । नाम्नोनित्य करिती । १५ । एक मास लोटल्यावरी । चालली यात्रा पंढरी । तंव अकस्मात स्वारी । शुकानंदाची आली असे । १६ । ओझाकांची देवळांत । येऊनी उतरले समस्त । देवीचे पुजारी सकुन विख्यात । हरदास गायक प्रतापी । १७ । त्यानें येऊनी गृहासी । वार्ता कळविली बाळकृष्णासी । शुकानंद नांदेडवासी । आमचे गृहीं उतरले । १८ । आणार उद्यीक पंढरीला । चलावे तुम्ही दर्शनाला । ऐकोनी वचन आनंद झाला । उठले तेव्हां तात्काळ । १९ । सत्वर जाउनी मंदिरीं । मस्तक ठेविलें चरणावरी । तंव धरिलें वरचेवरी । महाराजांनीं सत्वर । २० । अंगावर्णी कृपाकर । फिरविलासे वारंवार । बुध्दीवंत अती चतूर । लावण्य-कळा दिसती । २१ । तेज अंगावरी बहुत । भस्म देहासी चर्चित । रुद्राक्ष कुंडले श्रवणांत । कंठीं माळा शोभे बहु । २२ । प्रेमभरीत शुकानंद । हर्षयुक्त करिती विनोद । तेथें काय बोलावें मंद । म्हणोनी पाय वंदिले

। २३ । बाळकृष्ण म्हणती नाथा । कृपा करावी अनाथा । शरणागत ठेवितो माथा । सनाथ मज पावन करी । २४ । मजला परम पुरुषान । सांगितलें आपलें लक्षण । कीं शुकानंदासी शरण । जाउनी ज्ञान संपादी । २५ । तंव आपण अकस्मात । आम्हासी प्राप्त झालेत । उध्दारावे दिनाते । पूर्ण बोध करुनी । २६ । अनुग्रह दासा व्हावा । आपुला समागम घडावा । कृपाप्रसाद मिळावा । हेचि इच्छा दासाची । २७ । नाहीं मागणें धन दारा । नाहीं मागणें गृहपसारा । नाहीं मागणें विषय संसारा । निर हेतुक सेवा घडावी । २८ । सेवेनें होईल ज्ञानप्राप्ती । सेवेनें होईल विषय विरक्ती । सेवेनें हीईल पूर्ण स्थीति । ब्रह्मानंद सुखरूप । २९ । नलगे स्वर्गींचा भोग । नलगे इंद्रियाचा योग । दूर व्हावा कामरोग । हेंचि मागणें स्वामीला । ३० । निशीदिनी आपुला ध्यास । लागला होता मनास । इच्छा पूर्ण करावयास । प्राप्त झालेत सहजी । ३१ । अनंत जन्माचें संचित । झालें माझें भस्मभूत । प्रत्यक्ष भेटले गुरुनाथ । उदयकाळ झाला । ३२ । अगाध पूर्वींचें सुकृत । पावले आजी उदयात । म्हणोनी भेटले संत । दिनोध्दारा कारणें । ३३ । तव ऐकोनी स्तवन । अंतरीं संतोषलें मन । सग्द्दीत भरले नयन । अलिंगिले पोटासी । ३४ । मग येवोनी माता पिता । सांगती सकळ केलेली वार्ता । ऐकोनी म्हणती आतां । चिंता कांहीं करूं नये । ३५ । हा केवळ हरीहर उध्दाराचा अवतार । याचा महिमा अपार । होईल कोणा न वर्णवे । ३६ । पुत्र एकची असावा गुणी । कीर्ति करावी त्रिभुवनीं । उभय कुळ उध्दारुनी । आपण कृतार्थ व्हावे । ३७ । हेंचि सार्थक जन्माचें । करावें मानवानी साचे । तिन्ही लोकीं साचे । वंदिताती पाउल । ३८ । ऐसें ऐकोनी वचन । केलें सर्वांनीं नमन । तीर्थ प्रसाद घेऊन । प्रदोषपूजा आरम्भिली । ३९ । टाळ विणा मृदंग वाजती । आनंदानें बहु गर्जती । नाचुनीया सकळ डुलती । वदनीं शिव शिव म्हणतसे । ४० । भजन करुनी मंगळ आरती । श्री चरणासी ओवाळिती । प्रदक्षणा करुनी । वंदिती दीर्घदंडे करुनिया । ४१ । सकळ गेले आपुलाले गृहासी । बाळकृष्ण राहिले चरणापासी । तेथें चक्र मिलेनिसी । ब्रह्मानंदे करुनिया । ४२ । प्रातःकाळीं

सर्व उठोन । केलें नारायण भजन । मग स्नान संध्या देवार्चन । करिते झाले सर्वही । ४३ । तंव म्हणती महाराज । पंढरीसी निघावे आज । तेथुनी आल्यावर तुज । उपदेश देऊं बाळकृष्णा । ४४ । ऐकोनी नाथाचें वचन । केलें साष्टांग नमन । आपुले समागमे घेतो म्हणोन । प्रार्थना आरम्भिली । ४५ । तंव म्हणती तुजसी । घेऊन जाऊं नांदेडासी । आतां राहवे गृहासी । कोणीकडे जाऊं नये ।४६। माता पिता तुजविण । क्षणभर न राहती सोडून । त्यांची मर्जी संरक्षण । समीप राहून करावी । ४७ । त्यांची कृपा सम्पादावी । म्हणजे सर्व प्राप्त होईल बरवी । सद्गुरुनाथ इच्छा पुरवी । ऱ्हदयामाजी असेल जे । ४८ । आतां इतकेंचां वचन । अंतरीं दृढ धरुन । सदा ऱ्हदयीं चिंतन । आमचें असावें ।४९। पंढरीची यात्रा सकळ । तुज घडली असे बाळ । अंतःकरण बहु निर्मळ । म्हणोनी जवळ देव असे । ५० । ज्याचें अंतःकरण शुध्द । त्यासी करणें नको बोध । विचाराचा होय शोध । बुध्दीबळें सर्वदा । ५१ । असो आतां लवकरी । येथें येऊं तुज मंदिरीं । ऐसें बोलुनी सत्वरी । निघाले पंढरीला ।५२। पंढरीमाजी जाऊन । घेतलें विठ्ठलाचें दर्शन । कांहीं केलें ब्राह्मण भोजन । नवरात्र राहिले । ५३ । नित्य भजन पूजन । हरीहराचें कीर्तन । करिताती रात्रन्दीन । सुखापार नाहीं ज्याच्या । ५४ । एकरूप नित्य गजर । संत मिळाले अपार । करिती पताकाचे भार । चंद्रभागी नाचती । ५५ । माघा परीची यात्रा भरली । साखर पेढे वाटूं लागली । बुका तुळसी वाहिली । देवालागी बहुत । ५६ । गोपालकाला द्वादशावरी । जन निघाले नगराबाहेरी । प्रदक्षणा करूनी महाद्वारीं । लोटांगण घातिलें । ५७ । दाटी झाली अपार । आनंदे मांडिला गजर । वाद्यनाद बहु थोर । नभ कोंदोनी चालिला । ५८ । ऐसा सोहळा पाहुनी । निघाले तव्हां तेथुनी । मार्गीं येतां वदनीं । हरीनाम गर्जतसे । ५९ । भजन करीत नित्य चालती । महिमा पंढरीचा वर्णिती । निशीदिनीं मूर्ती ध्याती । सुखी डुलती स्वानंदे । ६० । दरकुच मुकाम करीत । अली सवारी मिळोनी समस्त । शाकंबरीचे मंदिरांत । येऊनिया उतरले । ६१ । ही वार्ता कळल्यावरी । धांउनी आले सत्वरी । बाळकृष्णादि जन सारी ।

वंदन केले शुकानंदा ।६२। हस्त जोडुनी प्रार्थना बहुत । बाळकृष्ण बैसले करीत । हे महाराज आमचे सद्‍नांत । उतरू असें म्हणाले ।६३। दासाची इच्छा पूर्ण । करणार आहे तुजा कोण । म्हणोनी धरिलें चरण । अनन्यभावें । ६४ । असो आज आमचे । घरीं यावे पाउल गुरुचे । मनोरथ दासाचें । पूर्ण करावें ।६५। ऐकोनी म्हणती कृष्णा । उदईक येऊं भोजना । आज उतरले सदना । आमंत्रण घेतलें । ६६ । उदईक येऊं सत्य । उपदेश करणें अगत्य । सकळ सिध्द साहित्य । आज करावे ।६७। आतां येथेंची करावे भोजन । आज्ञा केली महाराजान । तंव ऐकोनिया वचन । वंदन केलें नाथासी । ६८ । मग गृहासी आले तात्काळ । सांगितली वार्ता सकळ । उदईक भोजनासी दयाळ । येतो ऐसे म्हणाले । ६९ । मी जातों तेथें प्रसादासी । आपण सिध्द करा साहित्यासी । उदईक भोजनासी । येताती महाराज । ७० । ऐकोनी पुत्राचें वचन । अंतरीं संतोष मानून । सकळ सामुग्री सिध्द करून । बैसले स्वस्थपणें । ७१ । इकडे स्नान संध्या देवार्चन । केलें महाराजांनीं संपूर्ण । भोजनासी पात्र टाकून । पाचारिले बाळकृष्णासी । ७२ । ऐकोनी प्रभुची वाणी । धावोनी आले तत्क्षणीं । लोटांगण घातलें चरणीं । तीर्थ प्रसाद घेतला । ७३ । भोजन करुनी उठले । तांबूल सर्वांनीं घेतलें । क्षणभरी वामकुक्ष केले । शुकानंद नाथानी । ७४ । निजोनी उठले तात्काळ । मिळाले भक्तजन सकळ । वंदिती पादकमळ । सद्गुरु देवाचें । ७५ । मग महाराजांनी । उपनिषध भाष्य सांगुनी । गीतारहस्य वाचुनी । प्रदोष भजन आरम्भिलें । ७६ । भजन श्रवण करावयासी । जन मिळाले ग्रामवासी । आनंद न माय गगनासी । महा गजर झाला । ७७ । हार गजरे तुरे वाहती । कोणी साखर प्रसाद वाटिती । एक आनंदानें डुलती । स्वात्मबोधे कळेना ॥ ७८ । एक देहभानरहित । बैसले निचेष्टित । एक आनंदे नाचत । नानापरी भजन करी । ७९ । ऐसा रात्रीं केला गजर । निशी झाली अपार । मुखीं शिव हार हार । स्मरुनी निजले । ८० । सूर्य उदयासी । बैसले भजनासी । काकड आर्तिसी । करिते झाले । ८१ । आरती करुनी बैसले । वंदन सर्वांनीं केलें । आपुलाले गृहा गेले । आंबापूरवासी जन

। ८२ । आमंत्रण देण्याविषयीं गुरुसी । बाळकृष्ण विनवी नाथासी । वचन ऐकोनी मानसी । संतुष्ट झालें । ८३ । इकडे गृहामाजी पाक करून । सिध्द केले पूजा सामान । बोलाउ पाठविले त्वरेन । शुकानंदना- । ८४ । समस्त मंडळीसहित । निघाले भोजना त्वरित । वाद्य नाना वाजवित । गृहामाजी प्रवेशले । ८५ । पाद क्षाळूनी नाथाचें । आसन मांडिलें चौरंगाचें । भोंवताली रांगुळीचें । वेलबुट काढिलें । ८६ । नाना- परीचें उटण । सुवासिक तेल मर्दून । मग पाय घासून । स्नानासी बैस- विले । ८७ । उष्णोदक करूनी । गंगाळीं उपसोनी । स्नान घातलें सर्वांनीं वाद्यनादें करूनिया । ८८ । मग पुसिलें अंगासी । पितांबर दिधला नेसावयासी । आसनावरी सद्गुरुसी । बैसविले स्वानंदे । ८९ । भस्म सर्वांगीं लेपून । मग केलें आचमन । नित्य नेम साकून । बैसले स्वस्थपणें । ९० । पूजा सामुग्रीसहित । पुढें बैसले समस्त । आरंभ केला पूजेत । देशिका चिंतुनी । ९१ । बाळकृष्णसहीत अनुसया । उभय वंदिलें गुरुपाया । निर्विघ्न पूजिलें गुरुराया । दिक्षा घेण्याकारणें । ९२ । दिक्षा घेतली उभयत्र । पूजा करितां पवित्र । ब्राह्मण सांगती मंत्र । सद्गुरुपूज- नाचे ।९३। हस्त जोडोनी ध्यान । प्रीतिनें केलें वंदन । मग पाद प्रक्षाळून आचमन दिधलें । ९४ । वस्त्रा नेवसविले भार । दुशाला घातिला अंग- वर । भाळीं चंदन केशर । तिलक लाविला । ९५ । सर्वांगी लावुनी उटी । हार पुष्पांचें घालुनी कंठीं । गजरे बांधिले मनगटीं । मुद्रीका बोटीं घातिल्या । ९६ । गुलाल बुका परिमळ । अंगावरी वाहिला सकळ । धूप दिपाचा प्रज्वळ । केला असे बहु । ९७ । नैवेद्यासी समर्पून । मग हस्त प्रक्षाळून । फल तांबूल देऊन । दक्षिणा ठेविली पुढें ।९८। मंगल आरती करूनी । मंत्राक्षता वाहुनी । तीन प्रदक्षणा घालुनी । वंदन केलें साष्टांग । ९९ । तीर्थ प्रसाद घेऊनी । मस्तक ठेविलें चरणीं । कृपाहस्त गुरुनी । मस्तकीं ठेविला ।१००। मग भोजनासी बैसले । नाना पक्वान्न वाढिलें । श्रीगुरुसी तृप्त केलें । षड रस घालुनी । १ । भोजन करूनी गुरुला । मग तांबूल समर्पिला । आसनीं महाराजाला । निजविले क्षणभरी । २ । बाळकृष्ण बैसले गुरुपासीं । आरंभ मांडला पादसेवेसी । आनंदयुक्त

सदा मानसी । ध्यान करिती गुरुचें । ३ । तंव जागृत होउनी सत्वर । पाहतां झाले तीनप्रहर । मग अवलोकिलें गीतासार । अस्तमानपर्यंत । ४ । महाराजांनीं संध्या करून । आरम्भिलें प्रदोषभजन । एक रात्र तेथें राहून । उत्साह केला । ५ । दुसरे दिवशीं आपले । बिन्हाडासी गुरु गेले । महाराजासी पावते केले । समागमे जाउनी । ६ । तीन दिवस- पर्यंत । एकरुप आनंद करीत । महाराजासह समस्त । राहते झाले ।७। उद्देईक स्वारीं निघती । सेवक आज्ञा कळविती । निरुपासी प्रभु येती । सावध असावे ।८। ऐकोनी सेवकाची वाणी । बाळकृष्ण गेले धावोनी । साष्टांग घातिलें चरणीं । शुकानंद नाथाच्या । ९ । आशिर्वचन दिधलें त्यांनीं । पोटीं धरिलें कवळुनी । मुख प्रेमें चुंबुनी । करानें कुरवाळीले । १० । हात धरुनी गुरुसी । घेउनी आले गृहासी । बैसविले आस- नासी । वंदन केले सर्वांनें । ११ । तांबूल भक्षुनी ते वेळा । प्रसाद दिधला सकळा । म्हणती कृष्णासी सांभाळा । दिननिशी तुम्ही । १२ । हा पांग फेडील तुमचा । उध्दार करील सर्वांचा । संसार साधून साचा । परमार्थ करील । १३ । ऐसें ऐकोनी वचन । केलें सर्वांनीं वंदन । मग अश्वावरी स्वार होऊन । ग्रामाबाहेर निघाले । १४ । सकळ जन वाटे लावण्यासी । सत्वर येती प्रभुपासी । प्रदक्षणा घालुनी गुरुसी । वंदिलें सप्रेमें । १५ । मार्गस्थ करून सर्व । म्हणती सत्पुरुष महा अपूर्व । तिळमात्र नसे गर्व । ब्रह्मज्ञानाचा । १६ । येणेंपरी कथारस । पुढें होणार महारस । म्हणोनी देशिकानंदास । शेष म्हणे वंदितों । १७ । इतिश्री देशिका लीलामृत । पुराण नाहीं कोणतें संमत । नुतन कथा सज्जन परिसोत । शष्टमोध्याय गोड हा । ११८ ।

# अध्याय ७ वा.

। श्रीगणेशायनमः । श्रीगुरुभ्योनमः । जयजय गुणाध्यक्षा । जय जय विरुपाक्षा । जयजय सर्व साक्षा । सकळा परी तूं । १ । कामरूपा कमलासना । कार्तिकवीर्या गजानना । प्रसवलासी त्रिनयना । आपु- लेनी इच्छे । २ । महा प्रळयाचे अंती । उरसी केवळ निश्चिती । ब्रह्मा-

दिक मुक्ती । सकळ लोक । ३ । मायारहित ब्रह्म केवळ । उरे एकची निर्मळ । इच्छा मात्रे तात्काळ । प्रगट करिसी ब्रह्मांड । ४ । अनंत ब्रह्मांडाची रचना । करिसी तूं कैलास राणा । ब्रह्मादिकाचे ध्याना । न येसी कल्पांती । ५ । ऐसें तुझे गुरुपण । कोण करील वर्णन । यासाठीं सकळ शरण । येताती सप्रेमें ।६। प्रेमानें करितां ध्यान । त्यासी प्राप्त होसी सगुण । दूर करिसी अज्ञान । ऐसा कैवल्य दाता तूं । ७ । कैवल्याचा धनी । तूंची एक शूळपाणी । म्हणोनी लागलों चरणीं । अनन्यभावे ।८। निश्चयरूप राहावें मन । यासाठीं केलें स्तवन । दिननिशी संपूर्ण । मांडिले तुझे । ९ । तुझे प्रसादासाठीं । देवता त्र्याची कोटी । येवोनी राहिले पोटीं । वत्सपणानें ।१०। वत्सावरी माता जैसी । धावोनी येती स्नेहेसी । कवळूनिया मुखासी । चुंबिती सप्रेमें । ११ । या प्रकारें श्रोतेजना । केली बहु प्रार्थना । वक्त्याचे वचन ध्याना । कांहीं तरी यावें ।१२। श्रोतीयाचें अंतःकरण । प्रीय वाटावें स्तवन । ऐसें नाहीं बोलण । वक्तीयाचें ।१३। मुख्य श्रोता वक्ता गुरु । त्याचा नाहीं लागला पारु । वेद पढला जरी सारु । तरी त्यासी प्राप्त नव्हे । १४ । त्याचीच होईल करुणा । तेव्हांची अर्थ ठसेल मना । होईल दूर भवबंधना । पासून मुक्त तो ।१५। ज्यासी मोक्षाची चाड असे । त्यासी सारें सोपें दिसें । या वचनीं दृढ बसे । अंतःकरण जयाचें । १६ । त्यासीच होईल प्राप्ती । होई विषयाची तृप्ती । विचाराची व्लप्ती । प्राप्त होय तयास । १७ । ऐसें केलें निरूपण । मागील अध्यायाचें अंतीं जाण । शुकानंद निघाले अंब्याहून । बाळकृष्ण राहिले गृहीं । १८ । आतां यथोनी रचना । ऐकावे गुह्य वचना । याज करितां केली सूचना । श्रोतेजनासी । १९ । शुकानंद गेले पासुनी । बाळकृष्णासी ध्यास मनीं । केव्हां पाहीन नयनीं । चरण गुरुचें । २० । ध्यानानें झालें मन । विषय टाकुनी उन्मन । अखंड मांडिलें स्तवन । सद्गुरुनाथाचें । २१ । इकडे शुकानंद । मार्गी चालतीं स्वानंद । अखंड स्थीति ब्रह्मानंद । अजमामाची वृत्ती ।२२। नांदेडामाजी पावले । अंबापुरास पत्र लिहिलें । वरोनी निघाले आपुले । सुखरूप पोंहचलों । २३ । बाळकृष्ण भक्तरासी । सुखी रहावे गृहासी । ध्यासी अस्वर

तुम्हापासी । येऊत ऐसें जाणवा । २४ । ऐसें पत्र लिहुनी । पाठविलें तत्क्षणीं । तें पावलें तिसरें दिनी । अंध्यामाजी बाळकृष्णा । २५ । ते पत्र पाहुनी सत्वर । घातिलें तीन नमस्कार । घेउनी मस्तकावर । मग प्रेमें वाचिलें । २६ । असिर्वचन सर्वांसी । सुखीं पावलो गृहासी । वारंवार पत्रासी । पाठवित जावे ।२७। ऐसा समाचार ऐकून आनंदलें अंतःकरण । नित्य करिती पूजन । तया पत्राचें । २८ । ऐसें करितां एक मास । तंव वाटलें मनास । जाउनी नांदेडास । सद्गुरुसी भेटावे । २९ । ऐसें केलें अंतरीं चिंतन । माता पित्यासी पुसती वचन । मी जातों नांदेडा कारण । सद्गुरु दर्शनासी । ३० । भेटीसाठीं बहुत । माझे मनी उठला हेत । दर्शन घेऊन त्वरित । येईन मी गृहासी । ३१ । ऐकोनी पुत्राचें वचन । म्हणती काय लिहिलें गुरुन । त्याचें करुनी स्मरण । पहावें पत्रासी ।३२। तंव म्हणे माझी वृत्ती । स्थीर नाहीं हो निश्चिती । भेटेन जेव्हां गुरुप्रती । तेव्हां स्थीर होईल । ३३ । याज विषयीं आज्ञा द्यावी । मजला वाटे लावावी । हेंचि इच्छा बरवी । उठली मनांत । ३४ । ऐकोनी म्हणती कृष्णा । मोडुनी आमचे वचना । जाऊं नको दर्शना । नांदेडाप्रती ।३५। तेचि येणार आहेत । ऐसें लिहिलें पत्रांत । यासाठीं असावे स्वस्थ । येथेंच तुम्ही । ३६ । तुमें अज्ञान नाहीं गेलें । अंगीं तैसेंच राहिलें । गुरुनें काय सांगितलें । त्याचें स्मरण नसे कांहीं । ३७ । आतां मूढपण दूर करुनी । विचार करावा मनीं । प्रपंचीं लक्ष ठेवोनी । परमार्थ साधावा । ३८ । हाची गुरुचा बोध । तुज सांगितला शुध्द । त्याचा करुनी शोध । तदनुसार वर्तावे । ३९ । हेंचि आमचें सांगणें । अधीक नाहीं बोलणें । आतां तुम्हासी जें करणें । असेल तें करावें । ४० । आमची आज्ञा नाहीं आतां । ऐसें बोलुनी माता पिता । ऐकोनी त्याची वार्ता । निघाले उठोनी ।४१। शौच्याचे निमित्त करुनी । निघाले तंव ग्रामातुनी । गांवाबाहेर जाउनी । निघते झाले ।४२। चालत आले परळीवरी । वैद्यनाथाचे समोरी । उतरुनी देवळाभितरी । वंदन केलें शिवाला । ४३ । स्नान करुनी तीर्थांत । मग आले देवळांत । पूजा केली समस्त । प्रदक्षणा घातिल्या । ४४ । तंव ग्रामवासी एक ब्राह्मण । त्यानें ओळखिलें येऊन ।

म्हणें तुम्ही आलेत उठोन । परी आतां नका जाऊं ।४५। आमचे गृहाप्रति । भोजना चलावे निश्चिती । ऐसें बोलुनी कराप्रती । धरिते झाले । ४६ । ऐकोनी विप्र वचन । धरिलें त्याचें चरण । मधुकरी आणीन मागून । भक्षीण येथेंची । ४७ । तंव बळेंच नेले गृहासी । घातिले तेव्हां भोजनासी । म्हणे स्वस्थ असावे मानसी । चिंता दूर करावी ।४८। तुम्हासी कोठें जाण्याचें । आम्हासी कळवावे साचे । मग करूं कार्य तुमचें । यथा शक्तीनें ।४९। ऐकोनी म्हणे मजला । जाणें असें नांदेडाला । याजकरितां धरिला । मार्ग सत्वर ।५०। शुकानंदाचें दर्शन । होईल तेव्हांची सुदिन । ऐसें अंतरीं चिंतून । निघता झालों । ५१ । ऐसें ऐकुनी उत्तर । कार्य असें बहु थोर । आम्ही येतों तुमचेबरोबर । उदईक प्रयाण करावे । ५२ । श्रवणीं धरून वचन । एक दिवस राहून । मग प्रातःकाळीं उठोन । निघते झाले । ५३ । एक अश्वासमवेत । उभय चालले आनंदयुक्त । दरकुच मुकाम करीत । पावले नांदेडासी । ५४ । सत्वर गंगेसी केलें स्नान । करुनी संध्या देवतार्चन । जवळ होतें कांहीं तें भक्षून । गावांत प्रवेशले ।५५। शुकानंदाचे गृह कोणतें । लोका झाले पुसते । तंव एकानें नेउनी त्यांते । दाखविलें गृहासी । ५६ । मंदिरामाजी प्रवेशून । देखिले श्रीगुरुचें चरण । प्रेमभरित केलें नमन । शुकानंदमाथासी । ५७ । तंव देखोनी कृष्णासी । उचलून धरिले पोटासी । धन्य धन्य भक्तरासी । पूर्णपणें अवतरला । ५८ । अंगावरून हस्त । फिरविलासे निश्चित । वदन चुंबिले बहुत । ब्रह्मानंदे करुनी । ५९ । तूंची एक भक्त पुरा । होशील सर्वज्ञ खरा । आपण तरुनी परा । तारिसील भवाब्धी । ६० । परी तुझे मनीं इच्छा । ती पूर्ण होईल वत्सा । आतां एक तुज पृच्छा । करितों तें ऐकावी । ६१ । गृहामाजी सर्वजण । आहेत कीं सुखसंपन्न । याचें काय वर्तमान । आहे तें सांगावे । ६२ । गृहीं विचारुनी आलासी । किंवा उठोनी निघालासी । याचें सर्व मजसी यथार्थ सांगावे । ६३ । ऐकोनी श्रीगुरुची वाणी । प्रेम दाटला अंतःकरणीं । लोटांगण घालुनी चरणी । सांगते झाले । ६४ । माता पिता सर्वजण । गृहीं आहेत समाधान । आपुलें पत्र पाहून । बहु संतोप झालों । ६५ । त्या दिवसापासुनी

मजला । इच्छा झाली अंतःकरणाला । कीं जाउनी आपणाला । भेटावें सत्य पैं । ६६ । ऐसें चिंतुनी अंतरीं । निघालों ग्रामाबाहेरी । पूर्वीं सर्वांस बहुपरी । विचारलें असें । ६७ । त्यांनीं आज्ञा मजला । नाहीं दिधली जाण्याला । तंव उठोनी प्रातः समयाला । निघता झालों । ६८ । परळी-माजी एक दिवस । राहिलों यांचे गृहास । विप्रें घेउनी आम्हास । येथें आणिलें । ६९ । या प्रकारें वर्तमान । सांगून केलें वंदन । मग गुरुनें अलिंगून । जवळ बैसविलें । ७० । मग भोजनासी बैसले । भक्त सकळ मिळाले । सर्वांनीं प्रसाद घेतले । श्रीसच्चितानंदाचा । ७१ । इकडे काय वर्तमान । बाळकृष्ण गेला उठोन । माता पिता आप्तजन । चिंताक्रांत झाले । ७२ । तंव म्हणती नांदेडासी । जातो म्हणाला आम्हासी । प्रति-बंध केला त्यासी । त्या कारणें गेला असे । ७३ । आतां पत्र पाठवावें । त्याचें वर्तमान आणावें । त्याजला काय करावें । कोणाचें मानीना । ७४ । तंव शुकानंदांनीं बाळकृष्णाची । सुखरूप पोंचल्याची । गृहाकडे वार्ता साची । कळविली सत्वर । ७५ । आशिर्वाद पत्र लिहून । बहुत केलें समाधान । तुम्ही कांहीं चिंतन । करूं नये बाळकृष्णाचें । ७६ । जैसी तुमची प्रीति । तैसे आमची निश्चिती । याज विषयीं चित्तीं । विषमता आणूं नये । ७७ । पत्रासहित परळीचा ब्राह्मण । सत्वर पावला अंब्या-लागून । यथार्थ सांगितलें वर्तमान । गृहीं माता पित्यासी । ७८ । ऐकुनी पुत्राची वार्ता । सर्व दूर झाली चिंता । घेउनी पत्रिका हस्ता । पठण केलें । ७९ । तंव लिहिलें वर्तमान । कृष्णाची चिंता न करणें । सुरक्षित आहे गुणनिधान । कांहीं काळजी करूं नये । ८० । ऐसा पत्रार्थ जाणुनी । सर्व आनंदाते पाउनी । विप्रास घेतले ठेवूनी । आदर केला बहुत । ८१ । दुसरे दिवशीं ब्राह्मण । प्रातः स्नान करून । आपुला नित्यनेम सारून । भोजन केलें सत्वरी । ८२ । निरोप घेउनी स्वारी । निघाली परळीवरी । जाऊ-निया निजमंदरीं । पावता झाला । ८३ । इकडे तीन दिवस लोटलेवरी । बाळकृष्णाची कांता सुंदरी । अनुसया नामें पतिव्रता घरीं । ऋतु स्नात झाली असे । ८४ । फळशोभन करावें म्हणोनी । सकळ साहित्य केलें सदनीं । मग पत्रिका लिहूनी । पाठविते झाले । ८५ । एक अश्वासम-

वेत । मनुष्य पाठविले त्वरित । सांगती आठ दिवसपर्यंत । परत यावे । ८६ । नांदेडी काय वर्तमान । शुकानंदजवळ बैसऊन । नित्य करविती विद्यापठण । बाळकृष्णासी । ८७ । बहुत श्रवणाचा अभ्यास । नित्य मनन निजध्यास । चढ़ेन नाहीं रात्रंदिवस । ऐसा क्रम मांडिला । ८८ । गंगास्नान करुनी । कुंभ आणिती भरुनी । देवापूजा मांडुनी । ठेविती गुरुपुढें । ८९ । सकळ करिती कार्य । दिवसनिशी निर्भय । शुकानंदाचें अभय । वरदान मिळालें । ९० । गुरुकृपा कटाक्ष थोरी । त्यानें जिंकला कामवैरी । मदमत्सर संहारी । ज्ञानखडगे । ९१ । ऐसी सेवा करितां नित्य । त्याची दूर होती अनित्य । हें जाणावें वचन सत्य । साधक भक्तांनीं । ९२ । असो अत्रासमवेत निघुनी । मनुष्य आला नांदेडालागुनी । शुकानंदाचे सन्मुख येउनी । पत्रिका ठेविली पुढें । ९३ । मग पत्रांतील इतिहास । सर्व आणिला लक्षास । मग सांगितला बाळकृष्णास । तुम्ही जावे गृहासी । ९४ । रूतु प्राप्त झाला स्त्रियेसी । जावे त्वरें फळशोभनासी । चार मास राहुनी गृहासी । मग यावे आम्हावंड । ९५ । ऐकोनी गुरुची वाणी । संकट पडलें बहु मनीं । गुरुची अवज्ञा करुनी । राहणें व्यर्थ । ९६ । गृहासी गेलों जरी । पुन्हां येऊं न देती लवकरी । याचें संकट अंतरीं । पडलें बहुत । ९७ । असो मुख्य गुरु आज्ञा । नकरावी अवज्ञा । हें सांगितलें सर्वाज्ञा । महा पुरुषानें । ९८ । ऐसें समजोनी अंतरीं । मग निघाली स्वारी । महाराजाचे चरणावरी । साष्टांग वंदिलें । ९९ । अलिंगुनी प्रेमयुक्त । निघाले मार्गी लावीत । दुपारीनें बहुत । जावे गृहासी । १०० । श्रवण करुनी गुरुची वाणी । मस्तक ठेविलें चरणीं । आसिर्वचन संपादुनी । निघते झाले । १ । सत्वर पावले अंत्यासी । जाउनी आपुले गृहासी । वंदिले माता पित्यासी । ब्रह्मानंदे करूनिया । २ । प्रेमयुक्त माता पिता । आप्तजन समस्ता । अलिंगीलें निजसुता । चुंबिलें वदनासी । ३ । मग तिसरें दिवशीं । मुहूर्त पाहिलें निश्चयेसी । फळशोभनाचें साहित्यासी । सिध्द केलें असें । ४ । सकळ आप्तजन । ते दिवशीं आणवून । मंडप तुरे लावून । याज्ञिक आरंभिलें । ५ । हवनादिक क्रिया सर्व । गर्भाधानादि अपूर्व । ब्राह्मण करिती स्तव । नवग्रहाचा । ६ ।

पान सुपारी दक्षिणा । विप्रासी घातिलें भोजन । नाना वस्त्र भूषण । समर्पिले उभयासी ।७। वाद्य गानापरी वाजती । एकमेकां आहेर करिती । आनंद सर्वांचे चित्तीं । न माय कोठें । ८ । ऐसा गजर करोन कार्य झालें संपूर्ण । मंदिरामाजी येऊन । एकत्र केलें उभयासी ।९। सकळ सोईऱ्यांसी । भोजन । करुनी नाना पक्वान्न । वाढिलें बहु प्रीतिनें । संतोषविलें सर्वांसी । ११० । ऐसा सोहळा केला बहुत । पावले आपुलाले सदनांत । दिन-निशी आनंदयुक्त । राहते झाले ।११। माता पिता संतोषोनी । उपचार करिती पुत्रालागुनी । एकरूप आनंद सदनीं । राहिले प्रेमयुक्त । १२ । परी अंतरीं गुरुचा ध्यास । लागला बहु बालकृष्णास । केव्हां पाहीन चरणास । ऐसा निजध्यास लागला । १३ । नित्य करिती श्रवण । विवेकसिंधूचें पठण । विचार बखरीचें मनन । अभ्यास सर्वदा । १४ । नित्य नित्य ह्याची नेम । चालविला सप्रेम । आणिक दुसरें कांहीं काम । न करिती गृहाचें । १५ । चार मासपर्यंत । राहिले गृहीं सावचित्त । अनुसया झाली गर्भवन्त । प्रसादें गुरुच्या ।१६। एके दिवशीं पित्यालागुन । सांगितलें आपुलें वर्तमान । मी जातों दर्शनाकारण । श्रीशुक्लानंदाच्या ।१७। ऐकोनी म्हणती आतां । अव्य आणिले तुझेकरितां । उदईक पाठवितों निश्चिता । वचन एक ऐकावें । १८ । तेथें राहुनी विद्या सर्व । कीं जगामाजी असे अपूर्व । करावा सर्वत्रांनीं स्तव । हेचि इच्छा आमची । १९ । विद्यासारखें भूषण । दुसरें श्रेष्ठ नसे जाण । यासाठीं तुजलागुन । सांगितलें आम्ही । १२० । पुढें तुझें होईल हीत । कीर्ति वाढेल जगांत । द्रव्य मिळेल बहुत । न लागती प्रयास । २१ । ऐसें ऐकोनी वचन । घातिलें साष्टांग नमन । सर्वत्रास भेटून । निघते झाले । २२ । एक मनुष्यासी घेतले । सत्वर नांदेडासी आले । श्रीगुरुसी वंदिलें । आलिंगिलें प्रेमयुक्त । २३ । महाराजांनीं जवळ बैसविले । सर्व वार्ता प्रेमें पुसिले । यथाप्रकारें सांगितलें । सद्गुरुस्वामीसी ।२४। आपुले प्रसादान । कार्य झालें संपूर्ण । आणिक दासी आहे गर्भिण । आपुल्या इच्छेनें । २५ । ऐकोनी कृष्णाची वाणी । संतोष बहु मनीं । निजहस्त मुखावरुनी कुरवाळीते झाले ।२६। अश्व मनुष्य परत गांवासी । पाठवावे म्हणोनी स्वामी ।

पत्र लिहिलें महाराजापासी । स्वस्तीक्षेम पोंचलों । २७ । ऐसें वर्तमान लिहून । पाठविलें तया लागून । गृहामाजी जाऊन । पावला असे ।२८। पत्रांतील वर्तमान । अंतरीं सर्व समजून । मग राहिलें चिंतन । निज पुत्राचें । २९ । या प्रकारे कथारस । रचना झाली सुरस । पुढें होईल तें सावकाश । चित्त देउनी एकावे । १३० । ब्रह्मानंदा पूर्णचंद्रा । पार नाहीं गुणसमुद्रा । म्हणोनी वंदावी पदमुद्रा । सद्गुरु नाथाची । ३१ । श्रीगुरु देशिकानंदा । पूर्ण ब्रह्म पूर्णानंदा । अपार तुझी ज्ञानसंपदा । कुंठित झाली शेष म्हणे ।३२। इतिश्री देशिक लिलामृत । पुराण नाहीं कोणतें संमत । नुतन कथा सज्जन परिसोत । सप्तमोध्याय गोड हा । १३३ ।

# अध्याय ८ वा.

। श्रीगणेशायनमः । श्रीगुरुभ्योनमः । जयजय अनाथ बंधु । जयजय करुणासिंधु । महिमा तुझा अगाधु । देवाधि देवा । १ । नारदादि देव सकळ । तुज भजताती अचळ । म्हणोनी झाले निर्मळ । प्रसादे तुझिया ।२। बहुत केलें जपध्यान । बहुत केलें अनुष्ठान । परी तुझे अपार गुण । न कळे कोणासी । ३ । नाना योग साधिलें । परी नाहीं मन निवालें । जेव्हां भजनीं लागलें । तेव्हां झालें परि शुध्द ।४। संपादिलें दारा धन । केलें प्रपंच साधन । शेवटीं उरला आपण । एकलाची तो । ५ । आदि एक अंतीं एकला । सर्व जाउनी तो उरला । मग आठउं लागला । श्री चरणासी । ६ । मग आठउनी काय होते । कर्मानुरुप भोग घडते । या साठीं आत्मयाते । ओळखावे गुरुकृपे । ७ । गुरुकृपेचें ज्ञान । त्यासी नाहीं अपाय जाण । म्हणोनी धरिती चरण । अनन्यभावे । ८ । रात्रं-दिवस गुरुभजन । दुसरें नाहीं साधन । म्हणोनी जनकादिक जन । मुक्त झाले सर्वही ।९। मुक्तीसी साधन दुसरे । ज्ञानाविण नाहीं खरे । अद्वैत करावे चतुरे । भजनसेवा । १० । सेवा मुख्य साधन । त्यापासुनी होय भजन । ज्ञानाधिकार आपण । प्रगट होतो स्वभावे ।११। ज्यासी वैराग्य आगळे । करी भक्तीचे निदळे । साधुनी योग सोहळे । पावे मोक्षपंथा । १२ । भक्तिरसी नलगे मोक्ष । नलगे कांहीं अपरोक्ष । ज्ञानयज्ञ घडावे

हा पक्ष । करिसी नेमेसी । १३ । वारंवार व्हावा जन्म । सदा करावें गुरुचें काम । शेवटीं तेंचि यावें नाम । निज मुखासी ।१४। ऐसी ज्याची इच्छा मनीं । लागला सदा गुरुध्यानीं । त्याचेसारिखा त्रिभुवनीं । दुर्लभ असे । १५ । असो आतां एक चित्त । करुनी धरावें मनांत । मागील अध्यायांत । फलशोभनादिक झालें ।१६। येथुनी आतां कथाभाव । प्रगट होईल स्वभाव । त्याजवरी ठेवोनी भाव । श्रवण करा प्रितीनें । १७ । प्रितीनें करितां श्रवण । अखंड घडावें मनन । मग निज ध्यास योगान । साक्षात्कार होतसे । १८ । श्रध्दापूर्वक जें कर्म । फलद्रुप होती स्वधर्म । ऐसें जाणोनिया वर्म । आचरण करावें । १९ । ज्याचें जैसें आचरण । त्यासी तैसें घडेल साधन । म्हणोनी करावें संपादन । यथार्थ ज्ञानाचें । २० । ज्ञानें कडोनी आहे मोक्ष । ऐसें बोलिलें अपरोक्ष । अनुभवा आले प्रत्यक्ष । गुरुभक्ताचा । २१ । गुरुकृपा प्रसाद झाला । आपला आत्मा हातासी आला । स्व विलास पाहुनी भला । भजे श्रीगुरुसी । २२ । ऐसें केलें स्तवन । आतां ऐकावें कथालक्षण । मागील अनुसंधान । निरोपिलें तुम्हासी । २३ । शुकानंद ज्ञानसमुद्र । जैसा पौर्णिमेचा चंद्र । देवामाजी जेवी इंद्र । येणेंपरी सद्गुरु ।२४। बाळकृष्ण गुणाची राशी । जैसा नक्षत्रामाजी शशी । तेंवी अगाध सुकृतासी । सत शिष्य जाणावा । २५ । तंव एके दिवशीं गुरुनी । सकळ प्राण आकर्षुनी । आत्मा ब्रह्मांडीं नेवोनी । निचेष्ट बैसले ।२६। तीन दिवसपर्यंत । बैसले समाधिस्त । हें बाळकृष्ण पाहुनी समस्त । काय करिते झालें । २७ । महाराज समाधी उतरून । मग केलें देवतार्चन । तंव पुढें हात जोडोन । प्रार्थना मांडिली । २८ । हे महाराज मजप्रती । हा योग सांगावा निश्चिती । जेणें योगें चित्तवृत्ती । लयाप्रती जाय । २९ । ऐकोनी म्हणती महा कठीण । याचें आहे बहु साधन । योगाची सिध्दी होण । दुर्लभ असे । ३० । यायोगानें बहुत जीव झाले प्राणांत । ज्याचें कर्म सावचित । त्यासीच प्राप्ती असे ।३१। देहआशा सोडावी । अंतरीं दृढता धरावी । अष्टांग साधावी । अनुक्रमानें । ३२ । यम नेम ध्यान धारणा । प्राणायाम घाली आसना । प्रत्याहार समाधी जाणा । अष्टांग योगाचें । ३३ । येणेंपरी [redacted] तेव्हां

ब्रह्मांडीं जाय प्राण । नित्यानित्य अभ्यासान । दृढता पावे । ३४ । ऐसें श्रम करितां । होती जीवाची शुध्दता । परी महा कष्ट योग साधितां । होती शरीरासी ।३५। महा दुर्धर साधन । तुमच्यानें नाहीं होण । वृथा श्रम करण ; काय कारण ।३६। राजयोग साधावा । जडाजड विवेकावा । निर्विकल्प बोध व्हावा । चित्तासी पैं ।३७। या साठीं तुजला अधीं । सांगतों जें निरुपाधी । जेणें होय सुखसमाधी । चित्तासी जें ।३८। चित्त करुनी एकाग्र । श्रवण करावें समग्र । चतुरी न व्हावें व्यग्र । श्रवणकाळीं । ३९ । प्रथम करावें चार साधन । तेणें होय चित्त शोधन । मग पावे आत्मखुण । प्रसादें गुरुच्या ।४०। नित्यानित्य विवेक पाहिला । जडचैतन्याचा निवाडा केला । तो ऐकिजे भला । सावधपणें ४१ नित्य म्हणजे शाश्वत । परब्रह्म असे निश्चित । कालत्रयी अबाधीत । जाणावें पैं ४२ जेथें नाही अकार मात्र । नाहीं विकार पवित्र । निर्गुण केवळ पवित्र । पूर्णब्रह्म जें ।४३। सुख दुःख जेथें नाहीं । काम क्रोधादिक साही । इंद्रीय प्रकार दाही । नसे जेथें । ४४ । म्हणोनी त्याचें नाम नित्य । ठेविलें असें सत्य । हें जाणोनी अनित्य । विचार करावा । ४५ । आतां अनित्य तें कोणतें । जाण सकळ मायीपंते । प्रपंचादिक देहाते । ओळखावेगा ।४६। आकार मात्र जितुके । मिथ्या आहे तितुके । जाणोनिया करीनीके । विचार मात्र । ४७ । प्रपंच मुळींचा लटका । सत्य वाटला मुर्खा । पावले दुःख शोका विषयसंबंधीं । ४८ । आतां दुसरें साधन । मनासी वैराग्य होण । इहा मुत्रादि फळ भोगण । न इच्छीं सर्वथा । ४९ । इह म्हणजे या लोकीचा । भोग होणें राज्य सुखाचा । त्या विषयीं मनीं साचा । त्याग होईजे । ५० । अमुत्र तें स्वर्गसुखासी । इच्छा न व्हावी मानसी । दोन्ही भोग सोडोनी अभ्यासी । आत्म तत्वाला । ५१ । क्षमादिक शटक संपत्ती । साधावी सकळ निश्चिती । त्याची वेगळाली रिती । सांगतों ऐकिजे । ५२ । शम दम तप तितिक्षा । श्रध्दा समाधान लक्षा । एवं शडविध दक्षा । होउनी ऐकावी । ५३ । शम म्हणजे मनासी । जाऊं न दे विषयासी । बांधावे अंतरासी । विचार सुत्रानें । ५४ । दम ते चक्षुरादिक । इन्द्रियाचा मेळा पंक । विषयाकार होतो देख । मूढपणाणें ।५५। विषय टाकोनी सत्वरी ।

अकळावे अंतरीं । जाऊं न द्यावे बाहेरी । इंद्रियाते । ५६ । इंद्रियाचा व्यापार । विषय भोगानें वारंवार । ते त्यागुनी सत्वर । दृढ असावे । ५७ । सर्व विषय त्यागोनी । अंतरीं लाविजे ध्यानीं । मग पावे निज स्थानीं । स्वतःसिध्द । ५८ । तप तें आपले स्वधर्म । करावे वर्णाश्रम कर्म । ऐसें जाणोनी वर्म । शुध्द असावे । ५९ । ब्राह्मण क्षत्रिय वैश्य । शुद्रादिक अष्टादश । आपुलाले जातीचा अवश्य । स्वधर्म करावा ।६०। ऐसी वेदाची अज्ञा । तु जाणरे सर्वज्ञा । नाहीं कोणाची प्राज्ञा । बोधा-विषयीं ।६१। वेद मुख्य प्रमाण । मग झाले शड दर्शन । अष्टादश पुराण व्यासे निर्मिलें । ६२ । हेंची आहे मुख्य तप । साधनासी होय रूप । दूर होती सकळ पाप । ज्याचेनि योगें ।६३। तितिक्षा म्हणजे दुःख । अपार झाले जरी देख । याचा मनीं उल्लेख । येऊं नये कदापि । ६४ । सीत अथवा उष्ण । झाले देहासी पिडन । परी त्याचा एकही क्षण । स्वेद नये अंतरीं ।६५। अथवा सुख झाले अपार । नाहीं त्याचे हर्ष थोर । जो येईल भोग वारंवार । भोगीत असावे ।६६। श्रध्दा म्हणजे विश्वास । असावा गुरुवचनास । करावा तोचि अभ्यास । निश्चयपणें । ६७ । विश्वासानें कीजे श्रवण । करावें गुरुचें भजन । तया पावे आत्मज्ञान । गुरुच्या प्रसादे । ६८ । चित्त सोडोनी चिंता । पावे जेव्हां एकाग्रता । स्थीर राहे सावधता । त्याचें नांव समाधान । ६९ । समाधानपणें रहावे चित्त । हेंची जाणावें नेमस्त । येणेंपरी करावे सदोदित । अभ्यास भक्तीनें । ७० । मुमुक्षत्व चवथें साधन । मोक्षासी आहे कारण । अनन्यभावें शरण । गुरुसी आला । ७१ । त्रिविध तापी तापला । दुःखाग्नीमाजी पोळला । अतिशय तरमळू लागला । भव सागरामाजी ।७२। अध्यात्म अधी भूत । आधि दैवत । ऐसे त्रिविध होत । जाच शरीरासी । ७३ । अध्यात्मिक म्हणजे शरीरीं । नहेंज्वरादिक रोगाची भरी । त्यायोगें दुःख नानापरी । होतसे देहाते ।७४। चोर वृष्चिक सर्प । तोडोनी दंशति अमुप । लोका-पासुनी होणें कोप । हा ताप दुसरा । ७५ । नवग्रहादिक देवाची । अव-कृपा झाली साची । म्हणोनी खाण्या पिण्याची । अपदा भोगणें । ७६ । पूर्वीं देवताचें पूजन । नाहीं केलें यथा विधिन । पापाचें अधीकरण । त्या

योगें पीडिलें । ७७ । ऐसे त्रिविध ताप । जाणावे दुःखरूप । भोगोनी आपेआप । कंटाळतीते ।७८। त्रिविध तापानें जो युक्त । त्यासीच व्हावे वाटे मुक्त । त्यानें करावे यथोक्त । साधन या परीचें ।७९। ऐसें साधन करुनी । अखंड लागावे गुरु ध्यानीं । मग कृपा पात्र होउनी । तुटती भवबंध । ८० । तंव ऐकोनी शिष्यशिरोमणीं । दृढ लागला गुरुचरणी । मग वदे कर जोडोनी । सद्गुरु स्वामीते । ८१ । हे महाराज मजप्रती । शंका झाली असे चित्तीं । ती निरसावी निश्चिती । कृपाळुपणें ।८२। हा देह कशापासून । झाला असे निर्माण । हें सकळ सांगावें लक्षण । अनुक्रमे दासासी । ८३ । माया म्हणजे काय असे । अविद्या ती कोठें घसे । जीव शीव नाम कैसे । प्राप्त झाले ब्रह्मासी । ८४ । ईश्वर कोणा पासुन । झालासे निर्माण । हें सकळ सांगावें लक्षण । यथा प्रकारें ।८५। मी केवळ अज्ञानाची राशी । दूर करावे अविद्येसी । आपुले निज विद्येसी । कळवावे मज । ८६ । निज बोध देवोनी मजला । दाखवा मार्ग आपुला । तारावेजी भक्ताला । भवसागरीं ।८७। भवसागर दारुण । बुडालें सकळ जन । तेथें तारणार आहे कोण । गुरुवाचुनी । ८८ । या साठीं गुरुराया । दूर करावी सकळ माया । म्हणोनी लागलों पाया । अनन्य भावें ।८९। ऐसें ऐकुनां वचन । गुरुसी वाटलें समाधान । म्हणे माझें उघडिलें सदन । ज्ञानभंडाराचें । ९० । ज्ञानरत्नाची निजमाळा । घातिली म्या तुझे गळा । म्हणोनी झालासी अगळा । शिष्यशिरोमणी । ९१ । अनादी ठेविलें होतें गुप्त । तें तुजला झालें प्राप्त । सखा पूर्वीचा आहे आप्त । हें गुज कोणा मिळेना ।९२। या गुह्य ज्ञानासाठीं । लागले बहुत गुरुपाठीं । परी घातिलें एकाचे पोटीं । ऐक्यपणानें ।९३। निरगार दोन्ही । एक झाले तत्क्षणीं । तैसी गुरु शिष्य मिळणी । होणें दुर्लभ । ९४ । गुरु शिष्य एक झाले । ब्रह्मीं ब्रह्म मिळालें । अलंकार सुवर्ण ठेले । स्वतः सिद्ध जैसे । ९५ । या परी केलें वर्णन । झालें उभय समाधान । मग केलें नमन । सद्गुरु नाथासी । ९६ । आतां पुढील अध्यायांत । प्रश्न केले जे समस्त । त्याचे कळाले अनुभवांत । पावले अर्थ रस । ९७ । सकळ कर्माचा प्रास । होईल न लागता सायास । अखंड पीतें ब्रह्मरस । विचार बोधानें ।९८। कृष्णासी

सेंदिपानें । अर्जुनासी कृष्णानें । रामासी वसिष्ठानें । सांगितलें निजगुह्य ।९९। ऐसें परंपरा झालें ज्ञान । तेंचि निरोपिजेल तुज आगुम । त्याचें करूनि संरक्षण । तरावें भवसागरीं ।१००। सय ऐकोनि गुरुची वाणी । लोटांगण घातिलें चरणी । कृपाहस्त ठेविला मुर्धनी । कृत्य कृत्य म्हणावे ।१। ऐसे झालें निरूपण । देशिकानंद पूर्ण घन । दाविली आपली निजखूण । शंकर म्हणें भक्तासी ।२। इति श्री देशिकलीलामृत । पुराण नाहीं कोणतें संमत । नुतन कथा सज्जन परिसोत । अष्टमोध्याय गोड हा ।१०३।

# अध्याय ९ वा.

॥ श्रीगणेशायनमः । श्रीगुरुभ्योनमः । जय जय कैलासविहारा । जय जय गिरीजावरा । जय जय विश्वंभरा । कपर्दिशा पशुपते ।१। भाल लोचन भवाब्धी नाशा । भाम पराक्रम भुजंगभुशा । भूतप्रकाश पूर्णपरेशा । एक अंशा रूधरा ।२। नाना योनि प्रगटविसी । कर्मानुसार भोग देसी । जीवाचा उध्दार करिसी । कृपाळुपणानें ।३। त्याचे सकळ दुरिते । फेडूनिया समस्ते । दाविसी आपुले हातें । निज स्वरूपासी ।४। जीव तुझाची अंश । अविद्येमाजी प्रवेश । म्हणुनि झाला विशेष । तया अधीन तो ।५। असो पूर्वी निरूपण । सांगितलें चारी साधन । त्रिविधतापाचें लक्षण । कथन केलें सर्वही ।६। आता निरूपण ऐकावें । मन एकाग्र करावें । जें कथन होईल बरवें । दृढ धरा अंतरी ७ या श्रवणाचे थोर फळ । मोक्ष मिळे तात्काळ । म्हणोनिया सकळ । अवधान दिजे ।८। कांहीं न लागतां श्रम । पावतो अर्थ उत्तम । यासाठीं करा सुगम । साधन हेचि ।९। असो शुकानंद म्हणती रामा । बाळकृष्णा अगाध माया । सकळ सृष्टि गुणमया । होती जाली ।१०। प्रथम केलें बहु सरसें । तुज आठवलें कैसें । हें आतां उघड परियसे । अनुक्रमानुरूप ।११। अनादि निर्गुण केवळ । निर्विकार अचळ । निःसंग निर्मळ । संचल असे ।१२। अद्वैताची खाणी । जेथें नाहीं शब्दवाणी ।

तेंचि परब्रह्म सत्य मानी । अकार रहित । १३ । निराधार निराभास । निरामय स्वयंप्रकाश । अनंत सुखविलास । तेंचि परब्रह्म जाणा । १४ । निर्गुणापासुनी सगुण । कैसें झालें निर्माण । त्याचें ऐकावें लक्षण । यथा प्रकारें । १५ । स्वतःसिध्द ब्रह्म होतें । मग पावलें स्फुरण तें । अवलोकिलें आपणाते । तेथें माया झाली । १६ । जैसा निजूनिया जागृत । आपेआप होय निश्चित । मग अंतःकरण स्फुरत । कार्याकारें । १७ । तैसें ब्रह्म होते निजलें । स्वभावें जागृत झालें । तें आपणाते पाहूं लागलें । तेथेंची झाली माया । १८ । माया म्हणजे मिथ्यारूप । त्याचें निगम सारि केलें रूप । येथें ही सांगतों स्वरूप । कळावया कारणें । १९ । माया उदय होण्याचा काळ । ब्रह्मी झालासे सफळ । जैसी वृक्षासी येती फळ । कालानुसारें । २० । वृक्षासी फळाची उत्पत्ती । तैसी माया ब्रह्मी प्रगटती । फळ पक्व होण्याची गती । अनायासे येतसे । २१ । काळरूप माया झाली । त्यासी ब्रह्मे अवलोकिली । तिजला साभासता आली । ज्याचेनि योगे । २२ । मायेसी अवलोकिता । आले सक्षित्व नसतां । जीवे करून ईश्वरता । आली परब्रह्मासी । २३ । मायेचा केला अंगिकार । त्याचेच नाम ईश्वर । त्यापासूनि चराचर । होते झाले । २४ । माया ईश्वराचा संयोग । कधीं नाही वियोग । याचें विवरण सांग । ऐकावे चतुरी । २५ । माया देखोनि ईश्वरास । प्रपंच करावा बहुवस । ऐसें कल्पता मायेस । गर्भ राहिला । २६ । कालमानाचा ऋतु आला । तेणें मायेसी गर्भ राहिला । तेव्हां गुण साम्य तिजला । नाम आले असे । २७ । महत्तत्व नाम गर्भाचें । जेथें गुह्यत्व त्रिगुणाचें । तें शुध्द सत्व मूळ प्रकृतीचें । प्रगट झालें स्वभाविक । २८ । त्यापासुनी सुत्रात्मता । तेथें उमटली अहंता । त्रिगुण प्रसवली निश्चिता । शक्तिसहित । २९ । प्रथम झाला तमोगुण । द्रव्य शक्तीचें कारण । पंचभुत पंचविषय जाण । निपजते झाले । ३० । पंचभुत ते कोणते । जाण सांगतों निकते । त्याचें सकळ कार्याते । क्रमानें ऐक तूं । ३१ । प्रथम झाला शब्दविषय । त्यापासुनी आकाश होय । नभ स्पर्शा तेथिये । वायु जन्मला । ३२ । वायुपासुनि रूप झालें । रूप तेजाते व्यालें । तेजापासाव रस निघाले ।

रसी जन्म जळासी । ३३ । जळीं गंध गुण । तयोनी पृथ्वीसी होन । येणेंपरी भुत विषय जाण । प्रगट होते झाले ।३४। शब्दगुण आकाशी । स्पर्शत्व वायुसी । रूप गुण तेजासी । राहता झाला । ३५ । रसत्व उदकाला । गंधत्व पृथ्वीला । येणेंपरी विषयाला अधिष्टीते झाले ।३६। आतां रजोगुणाची उत्पत्ति । जेथें वर्ते क्रिया शक्ति । कार्यासहीत त्याची स्थिति । जाणाविगा । ३७ । दशइंद्रिय पंचप्राण । होते झाले निर्माण । त्याचें वेगळाले लक्षण । ऐकावें तें । ३८ । श्रोत्र त्वचा चक्षु तिन्ही । जिव्हा घ्राण हे दोन्ही । पांच ज्ञानेंद्रिय म्हणोनि । सांगितले असे । ३९ । श्रोत्रानें शब्द ऐकणें । त्वचेनें स्पर्श घेणें । चक्षुनें रूप देखणें । रस चाखी जिव्हा । ४० । घ्राणे परिमळ जाणावा । ऐसा इंद्रियाचा स्वभावा । पाहूनिया नाम तेव्हां । ज्ञानी असें ठेविलें । ४१ । वाचा पाणी पाद । चवथे गुह्य पांचवे गुद । हे कर्मेंद्रिय अगाध । कर्मे करिती । ४२ । वाचेनें शब्द बोलणें । हातासी देणें घेणें । पायासी चालणें । मुत्रोत्सर्ग गुह्यासी । ४३ । गुदे मळ सांडावा । येणेंपरी स्वभावा । कर्मेंद्रिय नांवा । पावले पांचही । ४४ । ऐसे इंद्रिय दहा । द्विप्रकारे झाले पहा । आतां प्राणपंचक महा । ओळखिजे । ४५ । व्यान उदान समान । प्राण आणिक अपान । याचे गुणस्थान । ऐकावेगा ।४६। व्यान सर्वांगी वसे । उदान कंठस्थानी असे । समान नाभी देशे । प्राण मुखीं नासिकी । ४७ । अपान गुदस्थानी । त्याची अधोगती वाहनी । येवं प्राण पंचकाची मिळनी । झाली असे । ४८ । दशेंद्रिय पंचप्राण । रजापासुनी निर्माण । पंधरा झाले असें जाण । कार्यक्रिया शक्तीचे । ४९ । सत्वापासुनी पांच झाले । ते जाणावे वेगळाले । ज्ञानशक्तिचेनी प्रस्वले । कार्यजात । ५० । अंतःकरण मन बुध्दि । चित्त अहंकार हे विधि । पांचही मिळुनी एक शुध्दी । अंतःकरण जाणावे । ५१ । निर्विकल्प धर्म अंतःकरणाचा । संकल्प विकल्प मनाचा । निश्चय धर्म बुध्दिचा । जाणावा पैं । ५२ । चिंतन धर्म चित्ताचे । मी म्हणणें अहंकाराचे । ऐसें लक्षण पांचांचें । सांगितलें असें । ५३ । ऐसी सत्वाची संतति । सांगितली तुम्हाप्रति । आतां ऐकसी पुढे । सृष्टिक्रम । ५४ ।

तंव ईश्वरे सकळ तत्वे दाटूनि । होती अनंत जीवाची खानी । महतत्व गर्भी त्याची रहनी । महाप्रळयासी । ५५ । ते जीव कर्मासहित । अवलोकिलें समस्त । कर्मानुरूप प्रारब्धांत । निर्मिता झाला । ५६ । जैसे संचित जीवाचे । ईश्वरे केलें तयाचें । वेगळाले देह ज्याचे । त्रिगुणात्मक । ५७ । या विषयीं तिघेजण । ईश्वरे केले निर्माण । हरिहर ब्रह्मा जाण । प्रसिध्द जे । ५८ । विधीनें सृष्टि करावी । विष्णुनें पाळावी । रुद्रानें संहारावी । ऐसें कार्य तयाचे । ५९ । तंव पंचभुताचा देहे । कैसा झाला तूं पाहे । महाभुताचा समुहे । त्यापासुनि अन्न । ६० । अन्नाचे शुक्ल शोनित । त्यापासूनि गर्भ राहत । होय पिंड निर्मित । पंच भुताचे ।६१। पंच भूताचे पंचवीस । सांगतों वेगळाले अंश । एकाग्र होउनी सावकाश । ऐक पा तूं ।६२। अस्ती मांसत्वचा । नाडी रोमावळी ज्याचा । हा समुदाय पृथ्वीचा । ओळखीजे । ६३ । लाळ मूत्र शोनित । स्वेद आणि रेत । हे पांचांश जळांत । निपजते झाले । ६४ । क्षुधा तृषा आळस । निद्रा आणि मैथुनास । हे तेजाचे अंश । जाणिजे पांचही ।६५ चलन वलन धावन । संकोचन निरोधन । हें वायुचें लक्षण । प्रगटलें असे । ६६ । काम क्रोध शोक । मोह भय हे पंचक । आकाशाचे सम्यक । अंश जाणावे । ६७ । ऐसें पंचवीस प्रकार । देहे केले साकार । त्यासी सहा विकार । बोलिले असे । ६८ । जायते अस्ती ते विवर्धते । विपरी नमते अपक्षीयते । सहावें विनस्यते । ऐसें जाणा उत्तम । ६९ । ज्यायते म्हणजे जन्म पावला । अस्तीते म्हणजे राहिला । विवर्धते म्हणजे वाढला । देहे तोचि । ७० । विपरी नमते तारुण्यता । अक्षीयते वृध्दता । विनस्यते मरण अवस्था । येणेंपरी साहा विकार । ७१ । साह विकारी पंचभुताचा । देह जन्मला स्थूळ साचा । पंचवीस अंशाचा समुदाय तो । ७२ । स्थूळ देह अवस्था जागृती । अभिमानी विश्व निश्चिती । नेत्रस्थान तयाप्रते । स्थूळ भोग असे । ७३ । ऋगवेद रजोगुण । कर्ममार्ग हे खुण । अकारमात्रा स्थूळ जाण । प्रत्यक्षपणें । ७४ । जारज खानी त्याची । विक्षेपता भूमि अर्धमात्रा । वैखरी वाचा साची । ऐसे ओळखिजे । ७५ । येणेंपरी भेद सारा । तुज निरूपिलें शिष्यवरा ।

यासी भुलूनि संसारा । पावला जीव । ७६ । चौऱ्याशी लक्ष योनी जिवासी जन्म पावोनी । नाना भोग भोगणी । कर्मानुसारे । ७७ । पुण्यानें स्वर्गासी जाणें । पापानें नर्क भोगणें । समतुकें प्रपंच करणें । जिवासी सत्य पै ।७८। स्थूल देहासी जाणता । देहे नव्हेसी तूं सर्वथा । याहूनि असे परता । द्रष्टा सर्वांचा तूं । ७९ । देहासी जरा मरण । देहासी भोग होण । देहासी जाती वर्ण । गोत्रादिक ते । ८० । हे सकळ देहाचे धर्म । आपुले ठायीं मानितो कर्म । हें जाणोनि निजधर्म । वेगळे होईजे । ८१ । वेगळेपणाचें लक्षण । साक्षीत्वेकडून पहाण । हेचि द्रष्ट्याची खुन । ओळखावि गा ।८२। या देहाचा ओळखिणारा । कोण आहेसी सांगबरा । तंव म्हणे गुरुवरा । न कळे मज कांही । ८३ । आपण सर्वज्ञाचे राव । सकळ शास्त्राचें वैभव । कृपाळुपणाचा स्वभाव । तुमचे अंगीं । ७४ । जैसा मेघ उदारपणें । सर्वांवरी वृष्टि करणें । त्याचे अवळ अधीक उणे । तीळमात्र नसे पैं । ८५ । तैसे तुम्ही कृपासागर । बोध करिता वारंवार । कीं दृढ व्हावे अंतर । ज्ञानाविषयीं ।८६। तुमचे पदरीं पडलों आतां । सकळ तुम्हासी चिंता । मी आपणाआपण विचारतां । कांहींच न कळे । ८७ । यासाठीं सकळ ज्ञान । मज करावे निरूपण । तरीच पावेन आत्म खून । प्रसादें आपल्या ।८८। आत्मा कोणते परी । ओळखावा अंतरीं । याची खुनपरी । कळवावी मज । ८९ । सांगोनी आत्मखुन । निवारावे जन्म मरण । अखंड घडावे भजन । श्रीगुरु चरणाचें । ९० । जरी पुढता जन्म झाला । परी न विसरावे गुरूला । दिननिशी सेवेला । झिजवावे शरीर ।९१। ऐसें ऐकोन दासाचें वचन । बारे होईल सकळ साधन । तुझे मनोरथ पूर्ण । सिद्धिस्मी पावती ।९२। आतां लिंग देहाचा । पुढें विचारे असे त्याचा । तोही यथाक्रमे साचा । कळेल तुज । ९३ । येणेपरी स्थूळदेहाचे । विवरण केलें जीवाचें । ब्रह्म ईश्वर दशेचें । कथन झालें । ९४ । मूळ माया साकार झाली । त्याची विवेचना केली । आतां होईल चांगली । रचना पुढें । ९५ । अनंदकंदा श्रीकृष्णा । भक्तसंकटा करी हरणा । साक्षात उमारमना । अवतार धरिली । ९६ । सच्चित्सुखात्मक श्रीगुरु । देशिकानंद पूर्ण ईश्वरु । आहे

भवसागरीचा तारू । शेष म्हणे भक्तासी । ९७ । इति श्रीदेशिक लीलामृत । पुराण नाहीं कोणते संमत । नुतन कथा सज्जन परिसोत । नवमोध्याय बोल्ल हा । ९८ ।

# अध्याय १० वा.

। श्रीगणेशायनमः । श्रीगुरुभ्योनमः । जयजय अपार सुखसदना । जयजय अपार गुणरचना । जयजय अपार नामधरणा । न कळती कोणासी । १ । करुणामृता कृपासिंधु । करुणाकर दिनबंधु । करुणोदय प्रबंधु । करविसी सकळ । २ । श्रीशंकरा भस्म लेपना । स्मशानवासा भाळलोचना । भक्तजन त्रिताप शमना । अगाध महिमा न वर्णवे । ३ । भक्तासाठीं जगदेशा । अवतरलासी परमपुरुषा । तुझे न कळे गुणपरेशा । वेदादिकांसी । ४ । वेद तुझा किंकर । मी काय वर्णू पामर । स्थापुनी चराचर । तूंचि असमी । ५ । तुझे सत्ते करून । सकळ झाले सचेतन । म्हणोनी केलें स्तवन । यथामतीनें । ६ । असो पूर्वोक्त प्रकरणीं । स्थूळ देहाची सहुणी । सांगितली बहु वचनी । गुरुनी शिष्यासी । ७ । आतां देहाचा विचार । ऐक म्हणतां साचार । जेणे होय संसार । मृगजळ प्राये । ८ । श्रीगुरुानंद महाथोर । बाळकृष्ण बहु चतुर । उभयता एक प्रकार । गुरुशिष्य जाणावा ९ तंत्र उभयाचा संवाद । सकळ ज्ञानाचाची बोध । चतुरे ऐकावा विनोद । स्वात्म सुखासी । १० । ज्यायोगे सकळ जग । दिसती प्रकृतीचेची अंग । ऐसा संताचा संग । पावतो सर्वांसी । ११ । न करिता यत्न कांहीं । अकस्मात लाभ देही । मोक्षाचा मिळतो पाही । सुकृते पूर्वीचा । १२ । असो स्थूळ देह आत्मा मानिता । त्याचे सकळ खंडिले भुता । म्हणोनि उरला आतां । साक्षीपणाणें । १३ । उरला साक्षी कोण । याचें नाहीं तुज ज्ञान । त्याचेंच करितों कथन । ऐक पां तूं । १४ । लिंगदेह साभास । वासनामय जन्मास । कारण भुतमय वास । निपजते झाले । १५ । ते लिंगदेह सत्वगुणाचे । पंचविसा कळाचे । ऐकावे यथातथ्य त्याचे । उत्तम करूनी । १६ । दश इंद्रिय पंचप्राण । विषय

पंचक अंतःकरण । ऐसे पंचवीस मिळून । लिंगदेह जाणावा ।१७। याचे वेगळाले लक्षण । करितों आतां विवरण । एकाग्र करुनी मन । ऐकावे बरें । १८ । श्रोत्रत्वचा चक्षु रसना । घ्राण मिळुनी पांचही जाणा । ज्ञानेंद्रियाच्या खुणा ओळखावे । १९ । वाचा हस्त पाद । चवथे गुह्य पांचवे गुद । हें कर्मेंद्रिय प्रसिध्द । पंचक जाणावे । २० । व्यान उदान समान । प्राण आणिक अपान । हे पांच ही मिळून । राहती लिंग देही । २१ । अंतःकरण मन बुध्दी । चित्त अहंकार पंचविधी । हे सकळ लिंग संबंधीं । जाणावे गा । २२ । शब्द स्पर्श रूप रस । गंध हे पांच विषयास । परस्परानु प्रवेश । मिळनी सांगतों ।२३। अंतःकरण व्याना। धारे । श्रोत्र इंद्रियाचेनीद्दारे । वाचा शब्द विस्तारे । शब्द गुण अकाशीं । २४ । मन उदानाचेनि योगे । त्वगेंद्रियाचेनि संगे । पाणी इंद्रिय स्पर्शु लागे । स्पर्श गुण वायुचा । २५ । बुध्दीसमान वसे । चक्षु द्वारे प्रवेशे । पादेंद्रियरूप विशेष । रूप गुण तेजी । २६ । चित्त प्राण· सवे । रसनेवरी धावे । गुह्येंद्रिय रूप बरवे । रस गुण जळि । २७ । अहंकार अपानाचेनि । घ्राणेंद्रिय प्रवेशुनी । गुदेंद्रिय गंधस्थानी । गंध विषय भूमिचा । २८ । ऐसे पांच प्रकार । भूतासी मिळाले साकार । त्यायोगें निरन्तर । भोग होती । २९ । एवं पंचविसाचा मेळा । सुक्ष्म देह जाण बाळा । याचा साक्षी तूं निर्मळा । वेगळाचि असे । ३० । लिंग देह स्वप्न अवस्था । याचा अभिमानी तैजस निरुता । कंठस्थानहि व्यवस्था । जाणावितें । ३१ । प्रविविक्त भोग यजु सत्व गुण । भक्ति· मार्ग असे जाण । उकार मात्रा ही खुण । दृढ धरिजे । ३२ । गता याता भूमि दुसरी । मध्यमावाचा ते अंतरीं । अंडज खानी हे पुरी । खूण जाणिजे । ३३ । ऐसे द्वादश प्रकार । लिंगदेहाचे निरधार । याचा केला विस्तार । कळावयासाठीं । ३४ । जंव पर्यंत लिंगदेहे । तंवपर्यंत संसार आहे । यासाठीं सकळ पाहे । साक्षी होउनी । ३५ । साक्षी होउनी पाहता । घडे नाश आयता । हे सांगितली व्यवस्था । तुज कारणें ।३६। लिंगदेहासी मरण । नाहीं ज्ञानावांचून । ते व्हावे यथार्थ ज्ञान । गुरु प्रसादाचे । ३७ । तंव शिष्य विनविलें । दोन्ही देह मज कळविले ।

कृपाप्रसाद फळले । निज दासासी ।३८। देह इंद्रिय प्राण । विषयादि अंतःकरण । हें जाणिले संपूर्ण । साक्षित्वेंची । ३९। साक्षी सर्वांचा झालों । याहुनि वेगळा उरलों । तो कोण आहे ते न समजलों । सद्गुरु नाथा । ४० । विक्षेप रूप अज्ञान । गेले माझे निरसून । परी दुसय अवर्णी उरले जसे । ४१ । तें अज्ञान सकळ । करावे स्वामी निर्मळ । पावावी तात्काळ । स्वरूपस्थिती ।४२। स्वरूपाचे अनुभवी । अविद्या दूर करावी । हे माझी प्रार्थना बरवी । ऐकोनी गुरुनाथ। ४३ तंव म्हणती ऐक वचन । जेणें होय समाधान । चित्त पावे आत्म निधान । तेचि तुज सांगतों । ४४ । जेथें मन इंद्रिय सकळ । झाले सर्व अचळ । ते अज्ञान प्रबळ । कारण देह जाणावा । ४५ । अज्ञान कारण देहासी । कार्य निपजले तयासी । स्थूळ सुक्ष्म नाम जयासी । ठेविले असे । ४६ । स्थूळ सुक्ष्म विक्षेप । कारण ते अवर्ण रूप । अज्ञानाचे द्विविध वस्रूप । जाणावे पैं । ४७ । अज्ञान देह सुषुप्ती । प्राज्ञाची उत्पत्ती । ह्रदयस्थान वस्ती । ओळखी जे । ४८ । आनंद भोग साम तमोगुण । वैराग्यमंत्रें मकार जाण । संश्लोष्टता ही खूण । जाण भूमिची ।४९। पश्यंति वाचा ज्याची । उत्पत्ती वेद ज्याची । ऐसें लक्षण कारणाची । तुज निरूपिलें । ५० । या सकळासी जाणता । त्याहुनि वेगळा आयता । तूं न होसी सर्वथा । कारण देहे५१स्थूळसुक्ष्म कारण । तिन्हीचे सांगितले लक्षण । आता उरलासी कोण । मग पा तूं ५२ तव म्हणें महाराज । हे नाहीं ओळख मज । आतां सांगावे सहज । निज दासासी । ५३ । मजला ओळख असे । तरी का लागले अज्ञान पिसे । म्हणोनि पावलों जीव दसे । भोगी जन्म मरणाशी । ५४ । सकळ अज्ञान जीवाचें । निरसावे स्वामी माचे । आतां न घडावे संसाराचे । येणें जाणें मज । ५५ । ऐसे बोलोनि ते क्षणी । दृढ लागले चरणी । तंव धरिले गुरुनी । पोटासी तयाते । ५६ । बा रे तुजला सकळ ज्ञान । पावेल न लागता क्षण । हे माझे प्रतिज्ञा वचन । ववड ऐकावे । ५७ । सुषुप्ती काळीं सुख उरते । त्याचे अनुसंधान तुंवे । सुख स्वरूप अनुभवाते । पावले सहजी । ५८ । अनुसंधान स्वरूपाचे । महा कारण नाम त्याचे । देह चवथा असे साचे । अवस्थातुरूप ।५९।

देह महा। कारण । तेथें तुर्या अवस्था जाण । प्रत्यगात्मा हे खूण । अभि- मानीयाची । ६० । मुर्धनीस्थान त्याचे । आनंदावभास भोग ज्याचें । अथर्वन वेद साचे । मुख्य असती । ६१ । शुध्द सत्वगुण ज्याचा । ज्ञान मार्ग असे साचा । मकार अर्ध मात्रेचा । होता झाला सत्य पैं । ६२ । भूमि चवथी तुलिनता । वाचा परा असे निश्चिता । उन्हीज खाणी हे व्यवस्था । जाणा महा कारणाची । ६३ । महा कारणाचे ज्ञान । झाले असे तुज लागुन । त्याहुनि विलक्षण आपण । ओळखिजे । ६४ । जे मन इंद्रिय अगोचर । तेणेंचि व्यापिलें चराचर । तोचि तूं असे निराधार । जाण स्वयं प्रकाशी । ६५ । तूं स्वतःसिध्द आयता । उरलासी आत्मा निरुता । तुझा तूंचि जाणता । असशी एक । ६६ । तुजपासुनिया चार । देह झाले सविकार । त्याचा तुज निर्धार । दाविला असे ।६७। जेथें नाहीं वर्णव्यक्ति । नाहीं स्वरूप अनुभव स्थिती । ते निरालंब असे निश्चिती । चैतन्य घन । ६८ । चारी देहाचा निरास । ठाव नाहीं अवस्थेस । कोठें पहावे भेदास । द्वाद्शाने । ६९ । देहाचे निरासी । ठाव नाहीं अव- स्थेसी । म्हणोनि साक्षीत्वे उरलासी । तूंचि एक । ७० । कार्यानुरूप साक्षीत्व तुझे । आले नसतांची सहजे । ते निवारिले सकळ ओझे । विचार बळे करुनी ।७१। स्थूळ सुक्ष्म कारण । चवथा देह महा कारण । याहुनी परता आपण । हेचि खूण आत्मयाची ७२ आत्मा अनंत अपार । नाहीं त्याचा पारावार । हा जाणोनि विचार । सावध असावे । ७३ । पंच कोश रहित । स्वरूप शुध्द निरुत । त्या पंचकोशाचा वृत्तांत । ऐकावा हो । ७४ । अन्न प्राण मनोमय । विज्ञान आणि आनंदमय । याचे वेगळाले प्रमेय । लक्षण ऐकावे । ७५ । प्रथम कोश अन्नमय । भुतापासूनि अन्न होय । अन्नापासाव देह । होता झाला । ७६ । अन्नर- सानें वाढला । अन्नाची भक्षु लागला । शेवटी अन्नाची झाला । श्वान सृगालाचे । ७७ । स्थूळ देह अन्नापासाव । होय अन्नाचा स्वभाव । म्हणोनि तयाचें नांव । अन्नमयकोश ठेविलें । ७८ । आता प्राणमय कोश दुसरा । त्याचें लक्षण अवधारा । जेणें चुके फेरफारा । संसारिचा । ७९ । कर्मेंद्रिय पंचप्राण । ऐसे दशक मिळून । प्राणमय कोश जाण । लिंग

शरीरीं । ८० । तिसरें मनोमय कोश । जाणिजे सावकाश । आपेआप प्रकाश । होईल विचारानें । ८१ । ज्ञानेंद्रिय पंचक । त्यांत मिळालें मन एक । तेजा नावे सम्यक । मनोमय कोशो । ८२ । विज्ञानमय चतुर्थ । ऐकिजे यथार्थ । तेणें साधे परमार्थ । आत्मविषयीं । ८३ । ज्ञानेंद्रिय बुध्दिसहीत । ओळखिजे समस्त । येणेंपरी समुदायांत । विज्ञान कोश म्हणावे । ८४ । प्राण मनो विज्ञान । कोशत्रय लिंगस्थान । आतां आनंद मयाची खूण । ऐक पा तूं । ८५ । नाहीं स्वरुपाचें ज्ञान । मूढ दशा अज्ञान । प्राणेंद्रिय बुध्दि जाण । लीन झाले ।८६। प्रियादि वृत्तिसहित । मलीन सत्व कारण भुत । असें अज्ञानाव्रत । आनंदमय तें । ८७ । आनंद कारण शरीरीं । सुषुप्तीचे अवसरी । ते ओळखिले चतुरी । यथा क्रमानें । ८८ । ऐसे कोश पंचकाते । जाणिलें सकळ कार्याते । तेव्हां पंचकोशातित ते । उरले स्वतःसिध्द । ८९ । पंच कोशाचा विस्तर । निगमसारी असे फार । येथें केला सारासार । कळावया कारणें । ९० । आतां सकळ केला निरास । उरला एक स्वयं प्रकाश । सच्चितानंदाचा ध्यास । असावा सर्वदा । ९१ । सच्चितानंदाचे लक्षण । ते ऐकावे प्रीति करून । जेणें तुटे भवबंधन । जीव दशेचे । ९२ । सतचित आनंद । हे जाणा शब्द प्रबंध । तीन स्वभावाचे एक पद । ओळखिजे ९३ सत म्हणजे कलत्रयात । असे ज कां अबाधित । चित्त ते ज्ञान अपरमीत । तया सीच असे । ९४ । आनंद ते सुखाची खानी । असे चराचरी भिरूनी । तें स्वरूप निर्वाणी । समस्त एकलें । ९५ । आत्मा जो तिरुप असे । तुर्याती प्रकाश मात्र दिसे । म्हणोनि साक्षीत्व वसे । देह त्रयाचे ।९६। देहत्रय जेथें नाहीं । तेथें तुर्या म्हणणें कांहीं । एक सच्चितानंद पाही । आत्मरुप । ९७ । जेथें दुसरेंपणाचें बोलण । कोनेकाळीं नाहीं जाण । म्हणोनि सच्चितानंद हे खूण । जाणावे निश्चिती ९८ सच्चितानंद स्वरुप आतां । झाल्यासी गा निरुता । तुझें तुज लागलें हाता । हरपलें होतें जें । ९९ । अनादि जें हरपले । तें तुज सांपडलें । आतां अज्ञान गेलें । आत्मविपर्याचें । १०० । आत्मविपर्यी अज्ञान । हेंचि थोर बंधन । आतां झालासी ज्ञानघन । सर्वात्म भावे । १ । सर्वात्मता अधिष्ठान । तुज

कळलें संपूर्ण । ही व्यतिरेक खूण । समजली असे । २ । आतां अन्वयाचा प्रकार । पुढें रचना होणार । त्याचा कळी विचार । सावध होईजे । ३ । अन्वयाची सिध्दी होता । न लागे कांहीं साधनता । आपे आप चढे हाता । निज स्वरूप । ४ । असो लिंग कारण । चवथा देह महा कारण । त्याचें केलें सकळ विवरण । कोश पंचकाचे । ५ । एवं सांगितलें तत्वज्ञान । श्रीसच्चितानंदाचें लक्षण । सर्व झालें निरूपण । तुज प्रति ऐं । ६ । आतां पुढील अध्यायी रचना । होईल बहु विवंचना । ते ऐकावी श्रोते सज्जना । प्रितीपुर्वक । ७ । सच्चित सुखानंदाचा दाता । कोणी दुजा नसे त्रिजगता । एक देशिकानंद गुरुताता । शोध म्हणें देखिला । ८ । इति श्री देशिक लीलामृत । पुराण नाहीं कोणतें संमत । नुतन कथा सज्जन परिसोत । दशमोध्याय गोड हा । १०९

# अध्याय ११ वा.

। श्रीगणेशायनमः । श्रीगुरुभ्योनमः । जयजय त्रिपुरा सुरदळना । जय जय त्र्यंबक राना । जय जय भक्त पालना । मनमोहना श्रीशैलया । १ । नट नाटका त्रिलोक हारा । दुःख दारिद्र संहारा । अपार संपत्ति दातारा । तुजसारिखा नसे कोणी । २ । आनंदकंदा अक्षयरुपा । संहारिसी त्रिविधतापा । अंत नाहीं तुझ्या स्वरुपा । दिनबंधु दयानिधे । ३ । महाकाळाचाही काल । तूंच असशी केवळ । म्हणोनि संसृति शेळ । तुज अधीन असे । ४ । या साठीं भवनी ईशा । धरली चरणाची आशा । तोडी सकळ भवपाशा । अविनाशा तूं एक । ५ । तुजला जे विसरले । ते नर्कासी पावले । नाना योनीसी संचले । कर्मानुसार । ६ । बहुत ताप भोगून जाण । आलासी श्रीगुरुसी शरण । त्याचे हरलें जन्म मरण । करुणाकर ईश्वरे । ७ । आतां असो बहुत स्तवन । मागील अध्यायीं केलें कथन । चारी देह निरसून । दाविले परम तत्वो । ८ । पंचकोशाचा विचार । सांगितला सारासार । सच्चितानंद त्रिपद सार । एकत्वे कळविलें । ९ । ऐसें झालें निरूपण । आतां करितो कथन । तें एकाग्र करूनि

मन । श्रवण करावे । १० । शुकानंद म्हणे बाळकृष्णा । तुज सांगितली विवंचना । चार देहाची रचना । कळविली तुज । ११ । चार देहाचा साक्षी । तूंच एकटा पक्षी । सच्चितानंद लक्षी । सर्वकाळ । १२ । तत्वमसी महा वाक्य । जेथ जिवेश्वराचे ऐक्य । अखण्ड पावे निज सौख्य । विचार बोधानें ।१३। ईश्वर सृष्टिचें कथन । एंकिजे निरूपण । जेणें पावे संपूर्ण । अन्वय बोध । १४ । पंचमहाभुताचा देह । ब्रह्मांड स्थूळ गाहे । विराट नाम तया आहे । जाण ईश्वराचें । १५ । त्याची उत्पत्ती अवस्था । अभिमानी ब्रह्मा निरुता । हे जाणावी व्यवस्था । विराटाची । १६ । श्रोत्र दिशा त्वचा पवन । चक्षु सूर्य जिव्हा वरुन । अश्विनी कुमार घ्राण । हे पंच ज्ञानेंद्रिय । १७ । वाचा वन्ही पाणी सु पति । पाद वामन गुह्य प्रजापति । गुद नैऋत्य ऐसी स्थिती । कर्मेंद्रियाची जाणिजे । १८ । अंतःकरण विष्णु असे । मन चंद्रमा वसे । बुध्दी ब्रह्मा दिसे । तया स्थानी । १९ । चित्त ते नारायण । अहंकार गौरी रमण । ऐसे देवतागण । इंद्रियासी तेथीचे । २० । ब्रह्मांडीं फिरे पवन । तोचि मुख्य त्याचा प्राण । त्याचें दैवत सुत्रात्मा जाण । विषय पंचक वेगळे । २१ । येणेंपरी समुदायासी । हिरण्यगर्भ नाम त्यासी । स्थिती अवस्था उपासी । ओळखाविना ।२२। विष्णु त्याचा अभिमानी । जो वैकुंठीचा धनी । त्याचें लक्षण जाणोनी । वेगळा होय । २३ । जेथं नाहीं देवतागण । नाहीं विषय जाणण । तेची देह कारण । माया नाम त्याचे । २४ । त्याची प्रळय अवस्था आहे । अभिमानी रुद्र पाहे । आपण वेगळा राहे । निरालंबपणी । २५ । महामाया देह चवथा । महाप्रळय जाण अवस्था । ईश्वर अभिमानी हे व्यवस्था । येणेंपरी जाणिजे । २६ । ऐसे चार देह अवस्था चारी । अभिमानी तयापरी । येवं झाली ईश्वरी । ब्रह्मांडादि रचना । २७ । हेचि पिंडासी कारण । कारणा पासुनि कर्म होण । हे स्वभाव लक्षण । गुण मायेचें ।२८। याचा अभिमान धरिता । ईश्वरासी आली शबलता । या कार्याहूनि परता । केवळ चैतन्य । २९ । कार्य कारण रहित । शुध्द उरले नमस्त । ते जाणावे समस्त । परब्रह्माची जु । ३० । तत्पद ईश्वराचे शबळ । विचारें केलें निर्मळ । आता उरले

केवळ । असी पद परमात्मा ।३१। जैसे अज्ञान शोधन । तैसेंच पिंडाचें भाण । त्रिगुण कार्य निरसून । झाला शुद्ध जीव तो ।३२। त्वंपद जीवाचें नाम । शबलत्वे करी प्रपंच काम । शुद्ध पावे निजधाम । असी पदात्मा । ३३ । उभयतांचे एक लक्षण । सर्व शबलत्व सांडून । असी पद ऐक्य होण । हेंचि महत्व तयाचें । ३४ । या साठी सर्व काळ । करावा विचार निवळ । पावावे पद अचळ । सत्गुरुकृपा । ३५ । त्वंपद म्हणजे जीव । तत्पद म्हणजे सीव । दोहींचा ऐक्य भाव । ते असी पद जाणणा । ३६ । असी पदी राहवी स्थिती । त्यासीच मिळे परम गति । अंगीकार केला संती । आपुले म्हणोनिया । ३७ । असो हे सृष्टिक्रम । सांगितला सुगम सुगम । हें जाणोनिया वर्म । निर्वाण असावे । ३८ । मायेचा सकळ खेळ । मिथ्या कीं मृगजळ । रजुवरी दिसे व्याळ । दृष्टिभ्रमानें । ३९ । एकची आहे तंतु सारा । झाला पटाचा पसारा । पाहता दिसे विचारा । एक तंतुची ।४०। जैसे मृत्तिकेच सुनी । अनेक घटादि कार्यं होउनि । परी पाहता निदानी । एक मातीच असे । ४१ । सुवर्ण एकची असे । त्याचे नग बहुत दिसे । परी कनकाविण काय असे । हे ओळखावि गा । ४२ । जळ पाहता एक । तरंग दिसती अनेक । पाण्याविण काय देख । असती ते । ४३ । तेवि ब्रह्मची केवळ । विश्वाकार झाले सकळ । परि जाणावे अचळ । ब्रह्मची असे । ४४ । गहू पेरिता गहू च होति । त्यासी अंतराय न येती । तैसी हे विश्व-स्थिती । चैतन्य मात्र । ४५ । चैतन्याची खाणी । उत्पन्न सकळ अधि-ष्ठानी । हें जाण त्यासी निदानी । एकत्व पावले । ४६ । आदि अंती एक चैतन्य । सर्वें दिसतें अन्य । जाणावे एक अनन्य । ब्रह्मची केवळ । ४७ । ब्रह्म चराचर देखिलें । आपण ब्रह्मरूप झालें । सर्व ब्रह्म बोला टळे । राजयोगीयासी । ४८ । राजयोगा झाला निपुण । अंतर बाह्य ब्रह्म व्यापून । अंतर उरले सघन । निर्गुण केवळ जे । ४९ । जैसें सूत विघरले एक । कणिका झाल्या अनेक । परी सूतपण देख । स्वतःसिद्ध असे । ५० । माया अविद्या उपाधी दोन्ही । त्यांत प्रतिबिंबले चैतन्य खाणी । मायादृष्ट ईश्वर म्हणोनी । अविद्या दृष्ट जीव । ५१ । दोन्ही

उपाधी सारख्या असे । उपाधिनुरूप कार्य असे । कार्यानुरूप कर्तृत्व दिसे । आरोपमात्र । ५२ । आरोप माया अविद्येचा । महावाक्यी निरसिला साचा । जीव शिव उभयाचा । सांडिला भेद । ५३ । भेद होता जेव्हां तरी । तंव जिव शिव संसारीं । भेद तुटता विचारी । महा वाक्याचा । ५४ । म्हणूनि माया मिथ्या झाली । तेंवि अविद्या कैंची राहिली । उभयत्र निरसिली । तें शुध्द चैतन्य ५५ शुध्दत्व लाधलें सत्य । शबलत्व सांडिलें अगत्य । ते अद्वय जाणावें नित्य । केवळ स्वरूप । ५६ । ऐसा हा निश्चय । श्रुतिशास्त्र संमत होय । आत्म प्रतिती ये । गुरुप्रसादे । ५७ । गुरुप्रसादाविण । नाहीं भवबंध छेदन । अविद्या होय दहन । ज्ञानोदयें । ५८ । गुरुकृपेचें ज्ञान । तेणें होय पावन । अविद्या पावे लीन । जेथींची तेथें । ५९ । अज्ञान अंधःकारासी । म्हणती अविद्या ऐसी । तिचा नाश होण्यासी । न लगे विलंब । ६० । सूर्याचा होता उदय जेव्हां । अंधार नाशतो सहज तेव्हां । तम न देखिलें केव्हां । अर्कानें सत्य पैं । ६१ । तेवीं ज्ञान विधेन । देखिलें नाहीं अज्ञान । ज्ञानाचा उदय होता जाण । अज्ञान नाशते । ६२ । अज्ञान दूर होण्यासी । नसे प्रयास कांही त्यासी । गुरुकृपा फळली ज्यासी । तत्क्षणीं नासे अज्ञान । ६३ । या साठीं स्वयें जावें । गुरुसी शरण रिघावें । तेणें आपेआप पावे । निज स्वरूप । ६४ । स्वरूपज्ञान ज्यासी झालें । त्याचें भवबंध तुटलें । पुनरपी नाहीं आलें । गर्भवासासी । ६५ । येणें परी ज्याची स्थिती । जीवन्मुक्त त्यासी म्हणती । जंव वर असतो भोगती । संसारकर्म । ६६ । करूनी कांहीं न करिती । भोगुनी कांही न भोगिती । जाणोनी कांहीं न जाणती । नवल ठेव । ६७ । त्याचे दृष्टीस सृष्टि नाहीं । पुढें काय होईल नेणें कांहीं । सत्ता मात्र सुखी राही । विदेही तो । ६८ । विदेही मुक्त जो झाला । त्याचे देव वंदिती पाऊला । ऐसा थोर जन्मला । त्रिभुवना माजी । ६९ । येणें परी गुह्य ज्ञान । पावलासी आपुले स्थान । सांगितलें तुज पूर्ण । यथार्थ बापा । ७० । हेंची करी अभ्यास । मग दुजा प्रयास । ऐसें ऐकोनी चरणास । मिठी घातली । ७१ । हे महाराज मजसाठीं । आपण बहु झालेत कष्टी । दाविलें

स्वरूपदृष्टि । माझे मजला । ७२ । आत्मप्राप्ति करितां । जन्म घेतले अनंता । आज पावलों स्वहिता । आपुल्या प्रसादें । ७३ । हा उपकार मजवरी । झालासे बहुभारी । फेडावयासी नाहीं सरी । कोणता उपाय । ७४ । आतां एकची साधन । पुन्हां जन्म घेऊन । अखंड करावें सेवा भजन । अनन्यभावें । ७५ । यापरते आन कांहीं । दुसरें साधन नाहीं । म्हणूनि लागलों पायी । श्रीसद्गुरुच्या । ७६ । आतां स्वामी सकळ । ज्ञान लाधलें अचळ । झालों मी निर्मळ । कृत्य कृत । ७७ । बाळकृष्ण म्हणें राया । शुकानंदा पूर्ण सदया । मज कृपा करूनिया । हठयोग सांगावे । ७८ । तंव म्हणती बाळा । किती सांगावें स्नेहाळा । योग कठिण आगळा । दु:खदायक जो । ७९ । असो तुझे मनोरथ जैसे । पूर्ण करावें आम्हां तैसें । योगाविषयी कर्म कैसें । करावें तें ऐक । ८० । नित्य घालिजे आसन । अल्प करावें भोजन । निद्राही तेंचि मान । सर्वदा असावी । ८१ । तंव म्हणे पूर्वी मजला । अष्टांग योग बोधिला । आतां सर्व सिध्दीला । पाववी जे । ८२ । ऐकोनि प्रिय वचन । मग घातिलें आसन । अधार बंधन देऊन । कुंडलिनी फिरविली । ८३ । प्राणें ओढिला अपान । झालें इंद्रिय रोधन । वृत्तिसहित मन । पावलें ब्रह्मांडीं । ८४ । आधार स्वाधिष्ठान मनीपूर । विशुध्द अग्नि ब्रह्मरन्ध्र । ऐसे भेदूनि काडचक्र । वायु नेला ब्रह्मांडा । ८५ । तंव शरीर झालें अचेतन । मग राहिलें चलन वलन । देह काष्टवत झाला जाण । योगमुद्रे करूनि । ८६ । एक दिवस पर्यंत । राहिले समाधिस्त । मग श्रीगुरुनाथ । काय करिते झाले । ८७ । समाधि उतरूनि बाळकृष्ण । मग धरिलें गुरुचे चरण । हे महाराज रात्रंदिन । येणेपरि असावें । ८८ । तंव म्हणति आतां तुज । प्राप्त होईल योग सहज । आतां नसे भय मज । योग सांगावयासी । ८९ । नित्य वज्रासनीं बसावें । सर्वांग लोळी करावे । वायु भक्षा धरावे । नासिक मार्गी । ९० । धोति पोति करावी नित्य । अंतर क्षाळावे अगत्य । अधोद्वारे जळ सत्य । आकर्शिजे । ९१ । येणे. परिचें साधन । मांडिलें बहु कठीण । तें सकळ झालें निपुण । गुरुप्रसादे । ९२ । दिवसं दिवस अधीकपणें । अभ्यास मांडिला येणें । हस्तगत

झाला तेणें । सकळ योग । ९३ । वायु ओढणें सोडणें । सकळ कळा धविणें । गुरुप्रसादानें । ज्ञानसिद्धि पावली । ९४ । हाटयोग राजयोग । साध्य झाले असे चांग । सकळ केलें प्रबंभंग । कृपाप्रसादें । ९५ । येणें परि सकळ गुह्यासि । कळविलें बाळकृष्णासी । पावूनि योग साम्राज्यासि । ब्रह्मानंदीं सुखी झालें । ९६ । मग श्रीगुरुची सेवा । आरंभिली सदैवा । दिवनिशी तोचि हेवा । अंतरीं धडलासे । ९७ । तंव शुकानंदासी पुत्र । चिंतामनी नाम पवित्र । सकळ प्रविण शास्त्र । असे जयासी । ९८ । त्यासी साहा पुत्र झाले । तेहि ज्ञानी अगळे । अगाध महिमा प्रगटिले । सद्गुरुनाथाचा । ९९ । मग वसुमतिमाजी । देशपांडे नाम संताजी । शिष्य आणिक कमळाजी । सरदेशपांडे । १०० । उभयतांनीं आपुलाले । ग्रामी एक एक गृह दिधलें । सरकारांतून नेमणूक केलें । क्षेत्रपात्राची । १ । तंव दोन्ही स्थळीं वास । मांडिलासे सावकाश । करिताती रात्रंदिवस । भजन गुरुचें । २ । असो आतां येथून । होईल पुढें कथन । तें ऐकावें संपूर्ण । सज्जनांनीं । ३ । चंद्रचूड अद्वयानंदा । भेद छेदका ब्रह्मानंदा । श्रीगुरु देशिकानंदा । बाप म्हणे कृपा करी । ४ । इति श्रीदेशिक लीलामृत । पुराण नाहीं कोणतें संमत । नुतन कथा सज्जन परिसोत । एकादशोध्याय गोड हा । १०५ । सम्पूर्णमस्तु ।

# अध्याय १२ वा.

श्रीगणेशायनमः । श्रीगुरुभ्योनमः । जयजय करुणानिलया । जय जय करुणा वरुणालया । जयजय अनंत गुणालया । भक्तवत्सला शिवगुरु । १ । जय चराचर अधिष्टाता । चराचर रक्षिता । चराचर प्राशिता । विलक्षण तूं । २ । आनंदरूप गौरीप्रिया । सकळांवरी करिसी दया । नाहीं तें दाविसी माया । ऐसी लीला अपार तुझी । ३ । अनंत ब्रह्मांडाचा नाथ । जीव उध्दरीसी अनाथ । तुजवाचुनि कोण समर्थ । भवसागरीं तारिता । ४ । भवसमुद्री तारु । तुंची एक सद्गुरु । तुझे गुणाचा पारु । नेणति ब्रह्मादिक । ५ । ब्रह्मादिक होती अज्ञान । त्यासी

कळविलें सकळ ज्ञान । त्यायोगें पावले निजस्थान । विद्यास्वरूप जें । ६ । ऐसी तुझी विद्या । मज फळलीगा सद्या । जी केवळ अनाद्या । चैतन्यशक्ती । ७ । तुझे कृपेचें महिमान । फळलें मजला ज्ञान । ही सत्ता तुझीच जाण । सर्वाविषयीं । ८ । सर्व तुझे स्वाधीन । म्हणोनी सकळ पराधीन । तुझे सत्तेकरून सिद्धीसी पावती । ९ । येणेंपरी करिसी कर्म । करुनी होसी अकर्म । हा तुझा स्वभावधर्म । न कळे कोणासी । १० । असो आतां श्रीशंकरा । नाहीं तुझा पारावारा । ब्रह्मादिकाचे विचारा । अप्राप्त तूं । ११ । मग म्यां काय बोलावे । कोणते स्तवन करावे । कैशापरि ध्यावे । श्रीगुरुनाथा । १२ । निर्गुण आणि सगुण । दोन्हीचें केलें विवरण । सकळ योग साधन । कळविलें बाळकृष्णासी । १३ । तंव म्हणती शुकानंद । अगाध कळे योगछंद । आतां जनक जननीपद । दर्शनासी जावे । १४ । ऐकोनी गुरूचें वचन । केलें साष्टांग नमन । प्रेमयुक्त अलिंगून । निघते झाले । १५ । येउनी आंबापुरी । पावले आपले घरीं । माता पित्याचें चरणावरी । वंदन केलें । १६ । अलिंगुन म्हणती आम्हासी । बाळा चयन नाहीं दिननिशी । पुत्र झाला तुजसी । नाम विश्वनाथ ठेविलें । १७ । मग पुत्रासी अवलोकुनी । आनंद झाला सर्वांचे मनीं । सकळ संतोष वार्ता लिहुनी । पाठविले गुरुकडे । १८ । पत्र पाहुनी गुरुला । आनंद बहुत झाला । सुदिन आज उगवला । सुवर्णापरी । १९ । चार मास गृहीं राहून । मग निघाले बाळकृष्ण । गुरुपाशीं येऊन । चरण वंदिले । २० । गुरु म्हणती सकळ जन । आहेत कीं समाधान । हें सकळ वर्तमान । निवेदन करावें । २१ । तंव म्हणे आपले कृपेन । सकळ आहेत सुखी जन । दासीस पुत्र होऊन । सवा मास झाले । २२ । येणेंपरी सकळ वार्ता । सांगुनी गुरुनाथा । चरणीं ठेविला माथा । अनन्य भावे । २३ । तंव म्हणति गुरुनाथ । जाऊं आतां प्रवासार्थ । मग एक अश्वासमवेत । निघते झाले । २४ । फीरत आले भोकरासी । राहिले भक्त गृहासी । तेथेंही झाले दासखासी । तरावया कारणें । २५ । मग बाळकृष्णासी । आणावी भिक्षा मागुनी । समस्त भक्त मिळुनी । भक्षण करावे । २६ । ऐसे केले

अकस्मात । मनीं वाटला बहु त्रास । जावे वाटे तीर्थाटनास । म्हणोनि गुरुसी प्रार्थिली । २७ । हे महाराज माझे मनीं । जावे वाटे तीर्थाटनी । आज्ञा द्यावी दासालागुनी । परत येईन सत्वरें । २८ । ऐकोनीया वचन । सत्वर यावे परतून । तवपर्यंत येथें राहीन । गृहाकडे पुढें जाऊं । २९ । तंव सत्वर केलें नमन । तीन प्रदक्षणा घालून । कृपाप्रसाद घेऊन । निघते झाले । ३० । नित्य करावें गुरुचें ध्यान । गुरुपादुकेचें पुजन । आणि लिंगार्चन । करिती नेमेसी । ३१ । शिवप्रदोष भजन करावे । प्रातः-काळीं नारायण स्मरावे । अखंड विचारावे । आत्म तत्वासी । ३२ । योगधारणा अभ्यास । करावा रात्रंदिवस । मनीं सदा निजध्यास । अन्य कार्य न करिती । ३३ । मार्गीं चालती आनंदान । नाहीं विषय चिंतन । अकस्मात एक ब्राह्मण । मार्गांत भेटला । ३४ । त्यानें करूनि नमन । म्हणे कोठें आहे जाण । हें सकळ वर्तमान । मजप्रति सांगावे । ३५ । बाळकृष्ण म्हणे आम्हासी । तिर्थे जावे ऐसी । इच्छा धरुनी मानसी । निघता झाला । ३६ । ऐकोनी वचन सत्वर । म्हणे माझें कार्य असें थोर । गृहीं मुंजीचें एक पोर । द्रव्यार्थी निघालों । ३७ । कोठें मिळेना धन । दिननिशी लागलें चिंतन । यासाठीं धरिलें चरण । कृपाप्रसाद मिळावा । ३८ । तंव म्हणती आमचे । समागमे चालावे साचे । कांहीं मिळालें धन त्याचें । संग्रहीं तुम्ही करावें । ३९ । संपादल्यावरी धन । जावे तुम्ही गृहालागून । करावें मुंजी बंधन । निज पुत्राचें । ४० । ऐसें उभयता बोलुनी । मार्गीं चालले मिळुनी । चन्हाडप्रांती प्रवेशुनी । एक ग्रामीं उतरले । ४१ । तेव्हां झाले दोन प्रहर । महर्गता होती फार । एक ब्राह्मण सदनी थोर । समाराधन होता । ४२ । त्यानें नेमाचे विप्र सांगितलें । द्वार लाऊनि बैसविले । ४३ । तितक्यामाजि पावले । उभयता तेथ । ४३ । हाका मारुनी घुसति । आम्हा भोजनास घ्या म्हणति । तंव म्हणे तुम्हाप्रति । घेत नाही सत्य पैं । ४४ । क्षुधेनें बहु पिडित । घालावे आम्हा भोजनांत । न ऐकोनी त्यांनीं मात । सत्वर पात्र वाढिलें । ४५ । तिष्ठत बाहेर दोघे बैसले । क्रोधें बहुत खवळले । तितकियात द्वार उघडलें । बळेंच मध्यें शिरती । ४६ । पुढें विप्र मार्गीं

आपण । मध्यें शिरले जबरीन । जंव दिधले लोटून द्वाराबाहेरी । ४७ । ते आणीक शिरावयासी । त्यानें लोटिलें कपाटासी । ते लागले मस्त-काशी । बाळकृष्णाच्या । ४८ । मस्तक फुटूनी रक्तधारा । स्नान झाले सर्व शरीरा । नेत्री येऊनी अंधारा । पडले धरणीसी । ४९ । तंव देखूनि सकळ जन । म्हणति जळो याचें भोजन । मारिला अजज ब्राह्मण । अन्नासाठीं दुर्बुध्दी । ५० । सर्वांनीं येऊनी जवळ । अंग धुतलें निर्मळ । अवशधीनें भरिले कपाळ । कुचलीनी ग्रहीं निजविलें । ५१ । मग यजमान येऊन । केलें साष्टांग नमन । करावें महाराज भोजन । तरीच रूर्ष करिती ।५२। तंव म्हणे आग्हाप्रति । भोजन करण नसे भिषिचती । आज्ञा आहे सर्वांप्रति । भोजन करावया । ५३ । सकळ ब्राह्मण चरणीं । वंदिती प्रार्थना करुनी । हे महाराज आपणा वाचुनी । अन्न न घेऊं सर्वथा । ५४ । ब्राह्मणाचा आग्रह पाहून । मग केलें सत्वर भोजन । सर्व विप्र संतोषून । ग्रहासी गेले । ५५ । मग तीन दिवसपर्यंत । वास केला तेथि ग्रहांत । मिळोनि ब्राह्मण समस्त । पुजा करिते झाले । ५६ । महाथोर आहे सत्पुरुष । केवळ ईश्वराच्या अंश । आम्हां केलें संतोष । स्नेहपणानें । ५७ । कोणी वस्त्र नेसविती । कोणी दुशाला पांघरिती । कोणी रुपये सुवर्ण मुद्रिका देती । आपुले कल्याणास्तव । ५८ । बहुत मिळालें धन । सकळ पाहिले आचरण । मग अनन्यभावें शरण । उपदेश घेती ।५९। कोणी अनुग्रह घेती । कोणी उगेच भजती । ऐसी पाहुनी स्थिति । मग निघते झाले । ६० । जें मिळालें वस्त्रभूषण । आणीक सकळ धन । समागमे होता जो ब्राह्मण । त्याजप्रति समर्पिलें । ६१ । आतां तुम्ही ग्रहासी । जावें त्वरें निश्चयेसी । आम्ही जातो वनासी । तपश्चर्या कारणें । ६२ । तंव येऊनी धरुन चरन । केलें साष्टांग वंदन । हे महाराज कार्य संपूर्ण । झालें माझें । ६३ । हा उपकार माझेवरी । न फिटे कधींतरी । ऐसें बोलुनी विप्र झडकरी । निघता झाला । ६४ । बाळकृष्ण फिरत फिरत । आले महा अरण्यांत । व्याघ्रादिक बहुत । त्या स्थळीं पावले । ६५ । आपला नित्य नेम साहून । केलें पल्लव भक्षण । क्षणभर केलें शयन । तये स्थळीं । ६६ । तंव नाहीं

जवळ वस्त्र काहीं । एक टोपी होती डोई । कौपीन घालून पाहीं । धावळ पांघरलें । ६७ । मृगचर्माचें आसन । कमंडलु एक जाण । गीतेचें पुस्तक पठण । नित्य करिती । ६८ । रुद्राक्ष माळा कंठीं । हातीं वेताची काठी । देवपुजेची पेटी । येणेंपरी जवळ असे । ६९ । हें ठेवोनी जवळ । निद्रा केली अचळ । तंव झाला सायंकाळ । मग उठते झाले । ७० । संध्या वंदन करून । मग आरंभिलें भजन । स्तोत्र पाठ करून । निद्रिस्थ झाले । ७१ । तंव उठोनी सूर्य उदयासी । नित्यनेम केला सायासी । भक्षण करावया पर्णासी । नाना वृक्षाचें आणिलें । ७२ । येणेंपरी पंच संवत्सर । तपश्चर्या केली अपार । तंव एके दिवशीं थोर । अनर्थ उदयला । ७३ । नित्यनेम प्रमाण । पल्लव आणिलें तोडून । त्यासी केलें भक्षण । तंव काय वर्तलें । ७४ । पोटामाजी आग पडली । सर्वांगी तळखी सुटली । प्राणांत वेदना झाली । परी दुःख राहीना । ७५ । दुःखानें बहु पीडित । कांहीं चालेना उपाय तेथ । तंव महा उंच पाहुनी पर्वत । तयावरी चढते झाले । ७६ । जाउनी पर्वतावरी । प्राण द्यावा ऐसे अंतरीं । चिंतुनी ते अवसरी । उडी टाकते झाले । ७७ । महा वृक्षाची दाटी । बोरी बाभुळी आराटी । नाना प्रकारची काटी । तेथें मिळली असे । ७८ । तंव उडी सांभर हात । येऊन पडलो नदींत । वस्त्र अंगारचें वृक्षांत । अटकुनी राहिले । ७९ । वाळुवरी नग्न पडले । शरीर प्राणांत झाले । अष्ट प्रहर लोटले । परी न झाले सावध । ८० । तंव नववे प्रहरी । अंग निवाळी शरीरीं । उठोनीया पाहती सत्वरी । वस्त्र नाहीं शरीराते । ८१ । म्हणती प्राणत्यागासी । उडी घातली निश्चयेसी । परी सांभर हात दूर कैसी । पडली असेल । ८२ । मुख्य गुरुआज्ञेविना । म्हणोनि झाली ही अवस्था । परी वृक्षावरिचें वस्त्र हरता । न येती आपण । ८३ । तैसेचि बैसले तेथ । तंव मोळवया एक अकस्मात । आला असे काष्ट वेचित । तया स्थळासी । ८४ । त्यानें देखोनी ते वेळीं । धावत आला जवळी । कोणी ऋषी या स्थळीं । राहिला असे । ८५ । मग समीप येऊन । केलें साष्टांग नमन । हे महाराज आपण । नग्न कां बैसले । ८६ । ऐकोनी तयाची वाणी ।

म्हणती वस्त्र गेलीं उडोनी । महा उंच स्थानीं । वृक्षावरी अडकलें ॥ ८७ ॥ मग तो सत्वर आऊन । वृक्षावरी चढून । वस्त्र आणिलें काढून । देता झाला ॥ ८८ ॥ वस्त्र देउनी सत्वर । वंदून केलें चरणावर । संपादुनी कृपावर । सुखी झाला ॥८९॥ मोळक्या काष्ट घेउनी । पावला गृहालागुनी । तंव रात्रीं चोर येउनी । अपार धन सांडिलें ॥ ९० ॥ तंव द्रव्य जमा करून । झाला बहु संपन्न । म्हणे ऋषीचें आशिर्वचन । फळलें असें ॥ ९१ ॥ शुकलें वस्त्र नेसुनिया । केली मग स्नान संध्या । बहु श्रमित झाली काया । अंत नाहीं दुःखासी ॥ ९२ । सकळ नेम साऊन । मग घातलें आसन । ब्रह्मांडीं चोढिलें प्राण । समाधिस्त बैसले ॥ ९३ ॥ अठरा दिवस पर्यंत । बैसले समाधिस्त । तंव एक शेतकरी गृहस्थ । त्या स्थळीं आला असे । ९४ ॥ म्हणे आज अठरा दिवस । कोण बैसला माणूस । असेल कोणी ऋषी तापस । तपश्चर्या करितो । ९५ ॥ हे सकळ पाहूनी वार्ता । ग्रामांत कळविली समस्ता । जन ऐकोनि म्हणती आतां । जाऊं सकळ पाहावयासी ॥ ९६ ॥ सकळ मिळुनी जन । सत्वर आले धांवून । तंव पाहिले येऊन । सत्यच बैसले असे ॥ ९७ ॥ करुनी वंदन सर्वांनीं । तीन प्रदक्षणा घालुनी । साष्टांग लोळती चरणीं । अनन्य भावें । ९८ ॥ तंव समाधी उतरली । मग वृत्ति सावध केली । नेत्र उघडुनी पाहूं लागली । तंव अपार मनुष्यें ॥९९॥ सकळ झाले भयभीत । कीं शाप देईल आम्हांत । समाधी केली अंगीत । ऋषीरायाची ॥१००॥ भीत भीत सकळ । धरिलें पादकमळ । मग दिधले अचळ । वरदान सर्वांसी ॥ १ ॥ शरीर बहु क्षीण । बोलती हळूं हळूं वचन । तंव प्रार्थिती सकळ जन । ग्रामांत चलावे ॥ २ ॥ ऐकोनी सकळांची प्रार्थना । मग अंतरीं आली करुणा । अंगीकार केले वचना । आनंद झाला सर्वांसी ॥ ३ ॥ ग्रामांत आऊनि चौघेजण । पालख आले घेऊन । महाराजांसी बैसऊन । नेते झाले । ४ ॥ नानापरिचे वाद्य वाजती । सकळ जन भजन करिती । हार तुरे बुका वाहती । महा मंदे करूनिया ॥ ५ ॥ सकळ ग्रामांत मिरवून । एक स्थळ चांगलें पाहून । उतरविलें नेऊन । त्या स्थळासी ॥ ६ ॥ ग्रामवासी सकळस्त्रिया । येवोनि लागती पाया । मग

स्नान घालूनिया । वस्त्र नेसविलें । ७ । केलें सर्वांनीं पूजन । दुधाची क्षीर करून । मुखामाजी घालती अन्न । आदरें करूनि । ८ । मंचकावरी शयन । करिती पादसेवन । रात्रंदिवस भजन । मांडिलें सर्वांनीं । ९ । एक मासपर्यंत । शरीर झालें स्वच्छ । मग सर्वांनीं बहुत । स्तवन केलें । ११० । हे महाराज आम्हांवरी । कांहीं दयाळा कृपा करी । म्हणोनिया चरणावरी । लोळते झाले । ११ । मग सर्वांसी अनुग्रह केला । आत्मानुभव बोधिला । आपुला मार्ग दाविला । तरावयासी । १२ । भवबंध छेदून । सकळ सांगितलें ज्ञान । झालें अंतरीं समाधान । शोडशोपचारें पुजिती । १३ । पूजा करूनि सर्वत्र । भजन करिति पवित्र । शुध्द झालें गात्र । गुरुकृपेनें । १४ । आतां आम्हां गुरुदर्शना । ऐकोनिया प्रभुवचना । सकळ करिती प्रार्थना । आम्हांसी त्यागूं नये । १५ । तुम्हांविण आमचा प्राण । जाऊं पाहतो देह सोडून । यास्तव न जावें टाकून । दीन जनांसी । १६ । ऐकोनि सर्वांची विनवणी । तुम्हीही चिंतन करावें मनीं । आणखी येवोनी । दर्शन देईन तुम्हांते । १७ । प्रभुवचन श्रवण केलें । नेत्रांसी आश्रू आले । धन वस्त्रादि अर्पण दिधलें । वाटे लाविलें सर्वांनीं । १८ । समागमे चौघेजण । निघाले गुरुसेवेकारण । सर्वांनीं वंदन करून । परत आले ग्रहासी । १९ । आनंदाश्रू नेत्रांसी । अंत नाहीं खेदासी । चयन नसे मनासी । दिननिशी सर्वांच्या । १२० । हे दयाळा गुरुराया । केव्हां दाविसी निजपाया । ऐसें बोलूनि ते समया । गुण आठविती गुरुचे । २१ । अखंड करिती भजन । सर्वदा गुरुचें ध्यान । दिननिशी नाहीं चयन । सर्व जनांसी । २२ । आनंदयुक्त बाळकृष्ण । मुखीं करिती गुरुस्मरण । कवशीक क्षेत्रा येऊन । ठकरते झाले । २३ । गांवाबाहेर शिवालय थोर । त्या लिंगाचें नाम कुशेश्वर । त्या स्थळीं सत्वर । सभामंडपामाजी । २४ । ग्रामांत कळलें वर्तमान । महाथोर सत्पुरुष येऊन । देवळामाजी ठकरून । भजन करितसे । २५ । ऐसें ऐकून सकळ । दर्शना निघाले तात्काळ । येऊनिया पादकमळ । वंदिते झाले । २६ । सकळ भजन ऐकोनि । तीर्थप्रसाद घेऊनी । साष्टांग लागले चरणीं । अनन्यभावें । २७ । मग सर्वांनीं फराळासी । दूध

साखर पेढियासी । आणोनि समर्पिलें तयासी । महाथोर म्हणोनिया । २८ । फराळ करुनी सत्वरी । निद्रिस्थ झाले ते अवसरी । उठोनि प्रातःकाळीं झडकरी । नारायण भजन केलें । २९ । ग्रामवासी सकळ जन । येवोनी केलें वंदन । प्रार्थना करिती आपण । भोजनासी यावें । ३० । ऐकोनि प्रीयवचन । कोणाच्या गृहासी न जाण । येथेंची यावें अणोन । साहित्य सर्वही । ३१ । प्रभुवचन ऐकोनी । साहित्य दिधलें आणोनि । स्वयंपाक सिध्द करुनी । प्रसाद्य आले सर्वत्र । ३२ । आठ दिवसप पर्यंत । आनंद झाला बहुत । अनुग्रह घेतले समस्त । महाराजापाशी । ३३ । बाळाभाऊ नामे देशमुख । घरीं आहे संपत्ति सुख । त्यानें इनाम दिधले एक । राहिल्या स्थळाच्या । ३४ परंपरा चाळावे । दानपत्र दिधलें बरवे । पुढें सवाशे रुपये मिळाले । प्रतिवार्षिक । ३५ । ऐसें योजना करुन । केलें सर्वांनीं पूजन । अपार धन देऊन । संतोषविलें गुरुसी । ३६ । मग सद्गुरुनाथ म्हणति । आम्ही जातो परभणीप्रति । तुम्ही असावे स्वस्थ चित्तिं । आनंदरूप सर्वत्र । ३७ । सर्वांनीं केलें वंदन । तीन प्रदक्षणा घालून । कृपाप्रसाद घेऊन । गृहासी परतले । ३८ । तंव आनंदयुक्त अंतरीं । परभणीसी आले सत्वरी । येउनी बाळाजीचे मंदिरीं । राहते झाले । ३९ । स्नान संध्या देवार्चन । केलें सर्वांनीं भोजन । क्षणभर वामकुक्ष करुन । बैसले उठोनिया ४० तंव ग्रामवासी सकळ । जन आले तात्काळ । वंदिलें पादकमळ । दृढ भक्तिनें । ४१ । पाहुनी महराजासी । इच्छा झाली सकळासी । शरण होउनी गुरुसी । भवसागरीं तरावे । ४२ । नित्य करिती सेवा भजन । आणोनी अर्पिति वस्त्र भूषण । बहुत देती धन ! सद्गुरुरायासी । ४३ । तंव एके दिवशीं महाराज । बैसले पूजा करीत सहज । अपार स्वरूपाचें तेज । न वर्णवे कोणासी । ४४ । सकळ बैसले होते जवळ । आपण अदृश्य झाले तात्काळ । तंव म्हणती गुरुदयाळ । कोणीकडे गुप्त झाले । ४५ । आतां होते पूजा करीत । आम्ही बैसलों समस्त । ही काय झाली मात । नवलाईची । ४६ । नऊ दिवस पर्यंत । दिसले नाही गुरुनाथ । दहावे दिवशीं अकस्मात । असनावर देखिले । ४७ । मग पाहुनी श्रीगुमुर्ति ।

प्रेमे चरणीं लोळती । हे महाराज दासाप्रति । त्यागूं नये सर्वथा । ४८ । आम्ही अनाथ दीन । पदरीं पडलों तुमचे जाण । क्षणभरी न राहे मन । आपणावाचूनिया । ४९ । ऐसें ऐकोनी दासवचन । केलें स्थीर सर्वांचें मन । प्रेमे वंदिती चरण । सद्गुरुरायाचे । १५० । मग आसा-धिकारी जन । दिधले इनाम करून । लक्ष्मी-नारायण मूर्ति स्थापून । स्थळ एक बांधिलें । ५१ । त्या स्थळीं राहुनी नित्य । करावें भजन पूजन अगत्य । ज्ञान विचार बोध सत्य । सांगति सर्वांसी । ५२ । येणेंपरी नित्य क्रम । चालविला सप्रेम । त्याकाळांतून सर्वदेही नेम । आसावरी वेळा असे । ५३ । आणीक मंदिरदिपासी । तेल दिधलें देवासी । अखंड चालावे ऐसी । आज्ञा झाली सर्वांते । ५४ । ऐसें झालें चरित्र । पुढें होईल पवित्र । तें ऐकावें सर्वत्र यथामतीनें । ५५ । सद्गुनानंद नित्य मुक्त । अखंड ब्रह्मांड भोक्ता । देविदासानंद गुरु वक्ता । बोध म्हणे धंदती । ५६ । इतिश्री देविक लीलामृत । पुराण नाहीं कोणते संमत । नुतन कथा सज्जन परिसोत । द्वादश अध्याय गोड हा । १५७ ।

# अध्याय १३ वा.

श्रीगणेशायनमः । श्रीगुरुभ्योनमः । जय जय जगद्वंद्यका । जयजय जगपालका । जय जय जगनायका । जगद्व्यापा जगद्गुरु । १ । नाना अवतार धरुनीं । नाना कर्म करूनि । अधर दुष्ट संहारूनि । सद्भक्त रक्षिले । २ । भक्तासाठीं अवतार । धरिसी तूं वारंवार । तुझे कृपेचा वर । फळला दासासी । ३ । म्हणोनि झाले ज्ञानी । नाना कर्म आचरूनि । परी नाहीं त्यांचें ध्यानी । बंधन कोणातें । ४ । सकळ एक-रूप । पाहाती तुझें स्वरूप । वेगळेंपणाचें माप । नाहीं कधींही । ५ । चराचर विश्व सकळ । भरलें एक अचळ । जाणोनिया निर्मळ । राहति ते । ६ । अंतःकरणीं झाली शुध्दता । नाहीं त्यासी द्वैतचिंता । सच्चिदा-नंद अखंडिता । पाहे चराचरी । ७ । ऐसा ज्याचा अभ्यास । त्याली काय भय स । दिसे चिन्मात्र दृष्टिस । आनंद कंद जो । ८ । आनंदाचा

सागर । सुखाचे डोंगर । प्रेमाचें पाझर । सुटती त्यासी । ९ । नाहीं कोणासी चाड त्यासी । एक भजति श्रीगुरुसी । त्यावाचुनी अन्यासी । न पाहे दृष्टीनें । १० । ऐसे थोर महा भक्त । ब्रह्मज्ञानी यथोक्त । तेचि जाणा जीवन्मुक्त । सर्वांश पैं । ११ । जीवन्मुक्ताची कोटी । येवी अपरोक्ष भेटी । ज्यासी नाहीं विवेक गोष्टी । ते मूढ जाणावे । १२ । ते जाणा पुश द्विपदाचे । नाहीं विचार ज्ञानाचे । झाले पाहुणे नरकाचे । जन्मोजन्मीं । १३ । या साठीं देवाधि देव । एक सद्गुरु स्वयं मेव । त्याचे चरणीं ठेवोनि भाव । अनुदिनी भजावे । १४ । सर्वांचें हेंचि मूळ । भक्ती करावी अचळ । मग त्यासी तात्काळ । आत्मरक्षा पावती । १५ । असो आतां पुरे स्तवन । पूर्वीं झालें निरुपण । बाळकृष्ण परभणींत राहून । शिष्य बहु संपादिले । १६ । आतां निरूपण चांगलें । तुम्ही ऐकावे श्रोते भले । जेणें होय आपुलें । कल्याण श्रवणीं । १७ । तंत्र क्षेत्रवासी गोसाईन । तिजला कन्या एक सगुण । तिचें झालें होतें लग्न । पूर्वींच पैं । १८ । तिचें नाम मनाबाई । शरण रिघाली बाळकृष्ण पायीं । भ्रतार त्यागिला लवलाही । गुरुसेवा करी बहुत । १९ । नित्य करावें भजन । गुरुपुढें नृत्य करून । ज्ञानेश्वरी वाचून । अर्थ ऐकावा । २० । नाना ग्रंथ वाचिलें । सकळार्थ अनुभविले । अखंड मन जडलें । सद्गुरुपाशी । २१ । माता पिता भ्रतारासी । सोडून दिधले सर्वांसी । एक गुरुचरणापाशी । भाव असे जिचा । २२ । अपार ज्ञान संपादिलें । गुरुप्रसाद फळले । तेणें योगें अंगीं भरले । ब्रह्मचिन्मात्र । २३ । सकळ ब्रह्मरूप ध्यावें । सत्तामात्र अवलोकावे । उभय योग बरवे । लाभले तिजसी । २४ । सकळकळा प्रविण । झाली ती अवधुतीन । साधुबाई नाम पाऊन । प्रसिध्द झाली । २५ । मग तिजला आपुले । समागमे घेउनी निघाले । सद्गुरु देशांना चालिले । आनंदयुक्त । २६ । सकळ ग्रामवासी जन । स्वस्थान दिधले जे करून । तेथें एक पुजारी ठेऊन । उत्साह करविती । २७ । माघ शुध्द सप्तमीपासून । दशमीपावेतो चार दिन । कीर्तनादि ब्राह्मण भोजन । करावे स्वानंदे । २८ । ऐसा नेम करुनी । समस्त भक्त मिळुनी । मार्गस्त करावया लागुनी । येते झाले

सर्वत्र । २९ । तेथुनी सत्वर निघाले । मग ग्रामाबाहेरी आले । सर्वांसि परत केले । प्रसाद देवोनि । ३० । मार्गी आनंदयुक्त चालत । येउनि पावले हाब्यात । एके ब्राह्मणाचे मंदिरांत । राहते झाले । ३१ । ग्राम-वासी सकळ जन । घेऊन येताती दर्शन । मग साहित्य सर्व आणून । देते झाले । ३२ । तेथें शिष्यही झाले बहुत । पूजा करिती आनंदयुक्त । नाना प्रकारे सेवा करीत । भक्तजन बैसती । ३३ । तंव ओकरीं काय वर्तमान । शुकानंद तेथें राहून । दोन संवत्सर मार्ग पाहून । कोपटीं निघाले । ३४ । येवोनि वसुमतिसी । पावे आपुले ग्रहासी । सकळ भक्त दर्शनासी । आले असे स्वानंदे । ३५ । मग सर्वांसी पुसती । आम्हि जातो पंढरीप्रति । आश्रम घेतो निश्चिती । आपण स्वस्थ असावे ।३६। मग निघाले पंढरीसी । तेथें पावले वेगेसे । संन्यास घेतला परमहंसी । पंढरींत राहिले । ३७ । एक वर्षानंतर । पुत्रानें लिहिला समाचार । येवोनी भक्त समग्र । कृतार्थ करावे । ३८ । इतके दिवसपर्यंत । आम्हासी भरले द्वैत । त्यायोगें श्रीचरणांत । मुकलो आम्ही । ३९ । आतां आपुली करूणा । दाखवावे श्रीचरणा । हेचि दासाची प्रार्थना । दिननिशी । ४० । ऐसें लीनतेचें पत्र । पाहुनिया सुपवित्र । प्रभुलीला विचित्र । निघते झाले । ४१ । मग शुकानंद मार्ग क्रमीत । आले सत्वर नांदेडांत । वार्ता कळली ग्रामांत । भक्त आले दर्शनासी । ४२ । गंगा-स्नान करूनि । आपला विधि सारूनि । राम मंदिरा प्रवेशुनी । राहते झाले । ४३ । पुत्रासी कळला समाचार । धाउनी आले सत्वर । लागले चरणावर । श्रीशुकानंदाच्या । ४४ । आनंदयुक्त अंतरीं । म्हणति बाळ-कृष्णाची सवारी । आली नाहीं आजवरी । कोठें राहिला असे । ४५ । माता पितादि सकळ । वाट पाहती अचळ । शोध नाहीं केवळ । चिंताक्रांत होती ।४६। मग सकळ मिळुनी । स्वामीसी चालले घेउनी । वसुमतिमाजी प्रवेशुनी । निजग्रहीं पावले । ४७ । अखंड करावे भजन । सदा स्मरणें नारायण । हाची क्रम चालवून । राहते झाले । ४८ । तंव इकडे बाळकृष्ण । समागमे भक्तजन । निघाले हाब्यांतून । वसुमतिसी पावले । ४९ । येवोनी सत्वरी गुरुद्वारीं । जय जय शब्द उच्चारी ।

साष्टांग वंदिलें चरणारी । अनन्यभावें । ५० । बहुत करूनि वंदन । प्रदक्षिणा घातिल्या तीन । मग गुरुनी पोटासी धरून । आनंदाश्रु सोडिले ।५१। जैसे जन्मांधासी दृष्टि । पावली अपैसी । मग त्याच्या सुखासी । अंतची नसे । ५२ । कीं प्रतिव्रतेचा भ्रतार । बहुत दिवस देशावर । मग पावला सत्वर । भेटी झाली उभयाची । ५३ । एकुलता एक सुत । तो पावला मृत्युंत । जीवंत झाला अकस्मात । त्या सुखा पार नाहीं ।५४। तेणेंपरी उभयतां । भेटले सत्वर निश्चिता । अंत नाहीं सांगता । ब्रह्मसुखासी । ५५ । सुखासी महा सुख भेटले । समाधान चित्त झाले । मग सर्वांनीं वंदन केलें । महाराजाप्रति । ५६ । मग वस्त्र भूषणासहित । पूजा केली अद्‌भूत । धन अर्पिलें समस्त । सद्‌गुरुरायासी । ५७ । संतोषुनी गुरुराय । वर दिधला आणि प्रिय । विजयी अखंड होय । पावे साम्राजासी । ५८ । पूर्ण अभिषेक करून । देशिकानंद नाम ठेऊन । गळा माळ घालून । विजयी केलें । ५९ । मग म्हणती गुरुनाथ । बापा झालासी सनाथ । आतां ऐकावें यथार्थ । वचन आमचें । ६० । माता पिता तुम्हाविण । नित्य चिंतनें झालें क्षीण । त्यांचें घ्यावें दर्शन । जाऊनिया अंब्यासी । ६१ । ऐकोनि गुरुवचना । दृढ धरिलें प्रभुचरणा । घालूनिया प्रदक्षिणा । निघते झाले । ६२ । समागमे भक्तजन । साधुबाईस घेऊन । अंबापुरी येऊन । ब्रह्मामाजी पावले । ६३ । माता पितीयासी । वंदिलें सवेगेसी । आनंदयुक्त मानसी । ब्रह्मीं राहिले । ६४ । पुत्राचें केलें व्रतबंधन । सवेची केलें लग्न । मग कांता झाली गर्भिण । नवमासा पुत्र झाला ६५ त्याचें नाम शंकर ठेविलें । मग पांचवें वर्षी मुंज केलें । तदुपरी विवाहा झाले । ब्रह्मानंदें करूनि । ६६ । बहुत दिवसाचे वृध्द । जनक जननी प्रबुध्द । मग उठला जरा संबन्ध । ज्वर उभयासि । ६७ । आधीं मातेचें निर्याण । पिता गत झाला मागून । उभयाचें करूनि विधान । एक संवत्सर राहिले । ६८ । मग निघाले तेथुनी । सकळ व्यवस्था लाउनी । पावले वसुमती लागुनी । साधुबाई समवेत । ६९ । वंदन केलें शुकानंदासी । वार्ता कळविली स्वामीसी । जे जे झाले गृहासी । तें सर्व सांगितलें । ७० । ऐकोनि सकळ वर्तमान । म्हणती ठेवावें

ब्रह्माचें चिंतन । यांत तुमचें कल्याण । आहे सर्वदा ।७१। श्रवण करुनी गुरुवचन । अंतरी जानके संपूर्ण । महाराज आज्ञाप्रमाण । आहे दासाची। ७२। मग चार मास पर्यंत । तेथें राहिले समस्त । तंव शुकानंदनाथास । ज्वर प्राप्त झाला ।७३। स्वामी म्हणति सकळासी। समस्त राहावे मजपाशी । शरीर सोडावें ऐसी । इच्छा झालि असे ।७४। वचन ऐकोनि सर्वत्र । न विसंबती क्षणमात्र । केव्हा सोडितील गात्र। सद्गुरुस्वामी ।७५। तंव तिसरे दिवशीं। म्हणति क्षुधा लागली आम्हासी। खावे वाटे मोदकासी । आणुनी सत्वर देईजे ।७६। तत्क्षणीं मोदक करून । पात्रीं पुढें ठेऊन । मुखीं ग्रास घालून । जल देती प्राशनासी ।७७। मोदक भक्षुनी सत्वर । म्हणति तृप्त झालें अंतर । निजविले आसनावर । प्रभुरायासी ।७८। क्षण एक लोटल्यासी । आज्ञा केली सर्वांसी । मज बैसवावे आसनासी। टेका देऊनिया ।७९। मग सत्वर उठवुनी । बैसविले मृगासनीं । सर्व बोलती प्रीय वचनीं। तुम्ही खुशाल राहावे ।८०। सकळ करिती भजन । तंव झाला सूर्यास्तमान । दक्षण पादांगुष्टो छिद्र पडून । रुधीर वाहूं लागलें ।८१। गुरुपुत्र अणाजी म्हणती । दूर केली क्रियाशक्ति । म्हणोनि अंगुष्ठाप्रति । छिद्र पडियेलें ।८२। भजनाचा गजर । पूजा करिती समग्र । विल्व तुळसी मस्तकावर । साचली असे ।८३। तितक्यामाजी वायु ओढुनी श्रवणचाले फुगउनी । ब्रह्मरंध्र फोडुनी। प्राण जाता झाला।८४। फट शब्द ऐकोनि । म्हणति कोठें उठली ध्वनि । तंव बाळकृष्ण उठोनी । विल्व काढिला मस्तकीचा ।८५। तंव हस्त भरला रक्तानीं । मग पाहिलें सर्वांनीं । ब्रह्मांड गेलें भेदुनी । आत्मशक्तीते ।८६। झाला सूर्याचा उदय। स्नान करूनी भक्तप्रीय । धांऊन आले जनसमुदाय। शुकानंदापाशी ।८७। मग समाधीचें स्थळ । सिध्द केलें तात्काळ । ग्रामवासी जन सकळ । पूजा करूं आले असे ८८ विमान करूनि सत्वर । स्नान घातिले मस्तकावर । वस्त्र नेसविलें सुंदर । पुष्पमाळा वाहिल्या ।८९। सत्वर विमानांत बैसवुनी । सकळ ग्रामांत मिरवुनी । नाना वाद्य वाजवुनी । भजन करिती भक्तजन ।९०। कोणी कुंकुम सडे

टाकिती । कोणी आरत्या उजाळिती । कोणी प्रसाद वांटिती । आनंद न माय सर्वांते ।९१। मीरवित आले विप्रापाशी । तंव लागले होट हका-यासी । स्वामी जप करिती दिननिशी । मग विप्रशी बैसविले ।९२। लवन वालु भस्म बिल्व दळ । स्वामीसी अर्पिले सकळ । समाधि केलि अचळ । ब्रह्मानंद वर्तला ।९३। सर्वांनीं पूजा केली । आपुलाले सदना गेली । अखंड स्मरूं लागली । श्रीगुरू नामाते ।९४। एक मासपर्यंत । बाळकृष्ण राहिले तेथ । मग साधुबाई समवेत । निघते झाले ।९५। सर्वांप्रति भेटुनि । मग निघाले तेथुनि । शहरामाजी जाउनी । राहते झाले ।९६। सोनाजीपंताचे घरीं । जाउनी उतरले सावरी । त्यानें येउनि पायावरी । मस्तक ठेविलें ।९७। तेथें राहुनी भजन पूजन । अखंड श्रीगुरुचें ध्यान । नाना विवेक सांगून । ज्ञान केलें भक्तासी ।९८। नासरद्दवला हुजूर । चंदुलाल दिवान पेशकार । गणेशराय सरदार । बहुत असती ।९९। दप्तरदार राजेरायवाले । नरहरीप्रसाद महा भले । तद्रूप राय दिवान झाले । मुत्सद्दी सर्वत्र ।१००। येणेंपरीचे बहुत । भागानगरचे गृहस्थ । सकळ आले दर्शनात । भवसिंधु ताराया ।१। तंव नित्य महाराजांनीं । नुतन कविता करुनी । ती सर्वत्रांनीं श्रवणीं । ऐकिली बहुत ।२। पद रचना बहु सरसी । अंत नाहीं सुखासी । श्रवणकरितां ते समयासी । वृत्ति होय तल्लीन ।३। सर्वांचे मुखीं तेचि वचन । तयाचेंचि करिती पठण । ही वार्ता चंदुलाल ऐकून । फार संतोष झाला ।४। मग दर्शनाची चाड धरुनी । महाराज आहे कोणे ठिकाणीं । याचा सर्व शोध घेउनी । काय करिता झाला ।५। जवळ होते सर-दार । त्यासी पुसे समाचार । शुद्धानंद शिष्य महाथोर । त्याचें दर्शन घडवें ।६। ऐकुनी प्रीय वचन । म्हणति करऊं वर्तमान । मग सत्वर येऊन । सांगती महाराजा ।७। हे महाराज आपुलें । चंदुलालनें स्मरण केलें । दर्शनास इच्छिलें । सादर चरणाच्या ।८। ऐकोनि तयाची आनंद झाला बहु मनीं । उदईक जाऊं त्या स्थानीं । भेटुनी येउत ।९। ही वार्ता कळविली त्यासी । अंत नाहीं सुखासी । चंदुलाल मानसी । संतुष्ट झाला ।११०। दुसरे दिवशीं प्रातः[illegible] आले ते

वेळीं । त्यान्यासहित मंडळी । थोर थोर समागमे । ११ । येवोनी महाराजाते । प्रार्थना केली समस्ते । मग तत्क्षणीं उठोनियाते । बैसले सुखासनीं । १२ । मंडळी समवेत निघून । आले वयाचे गृहालागून । सत्वर चंदुलाल द्वारास येऊन । वंदन केलें साष्टांगीं । १३ । हस्त धरुनी मंदिरांत । आसनीं बैसविलें संत । तंव आणोनी द्वारा पुत्रात । घातिलें चरणावरी । १४ । सर्वत्र मंडळीसी । पानदान दिलें त्यासी । महाराजाचे पुजेसी । साहित्य आणविलें । १५ । शोडोपचारे पूजा । अर्पिली महाराजा । मग संपादिला वोजा । आशिर्वाद प्रभुचा । १६ । तीर्थ प्रसाद घेतले । मग बहु प्रार्थिले । नित्य दर्शन आपुलें । दासासी घडावें । १७ । ऐकून प्रीय वचन । इच्छा होईल तुमची पूर्ण । अवतारलेत संपूर्ण । जनकापरी । १८ । कर्णासारिखा धर्म । सकळ निष्काम कर्म । आणोनि आत्मज्ञान धर्म । क्रीडा करिता तुम्ही । १९ । तंव म्हणे मज-प्रति । श्रवण व्हावी माहय स्तुति । जेणें पावे परमगती । प्रसादे आपुल्या । १२० । संतोषुनी सत्वर । मग दिधला कृपावर । सिध्द होईल अपार । इच्छा असेल जे । २१ । समस्त सांगती वर्तमान । साधुबाई नित्य येऊन । श्रवण करवील आमचें वचन । निश्चयेसी ऐकावे । २२ । प्रीय मानुनी संतवचन । मग घातिलें लोटांगण । कृपाहस्त मस्तकीं ठेऊन । निघते झाले । २३ । परत आले गृहासी । वाहि लाविले त्यान्यासी । सकळ लागले चरणासी । अनन्यभावें । २४ । मग चंदु-लालान । खर्चाची नेमणूक करून । महावार यावी पाठऊन । महाराजासी । २५ । आनंदयुक्त अंतरीं । भवतजन सेवा करी । जन्म मरण व्हावे दुरी । यदर्थीं कारण जे । २६ । तंव नित्य पद नवे । पंच करावे स्वभावे । मग साधुबाईनें वरवे । आणावें ध्यानासी । २७ । विणा घेऊनी चंदुलालाचे । गृहीं गायन करावें पदाचें । ऐकुनी प्रेमरसाचे । आश्रु गळती । २८ । मन होऊनी उन्मन । नाहीं शरीराचें भान । अखंड लागलें ध्यान । आत्मस्वरूपाचें । २९ । ऐसी चंदुलालाची स्थिति । साधुबाईस प्रिय करिती । क्षणोक्षणी अलिंगिती । प्रेमभावानें । १३० । मग नित्यानित्य । श्रवण करिती अगत्य । संतोष होउनी सत्य । वंदन

करी । ३१ । तीन संवत्सर पर्यंत । राहिले सद्‌वोदीत । एके दिवशीं आनंदयुक्त । चंदुलाल बैसला । ३२ । महाराजांसी काय द्यावें । अंतरिं चिंतन केलें बरवें । एक ग्राम चांगलें पाहावें । आज्ञा केली सरदारा । ३३ । तंव दफ्तरदारांनी । समीप सत्वर येवोनी । म्हणति किती रुपयाचा पाहुनी । गांव ठेवावा । ३४ । साधुबाईसी पुसे राजा । काय द्यावें महाराजा । ती म्हणे सद्‌गुरु काजा । ग्राम एक देईजे । ३५ । सहस्त्र रुपयांपर्यंत । वसूल मिळावा तेथ । देवोनी म्हणे पोंचवावें । मिळतील सर्वदा । ३६ । ऐसें बोलुनी तत्क्षणीं । सनद दिधली करुनी । नाम तुकाराम लिहुनी । मोहर केली त्यांजवरी ।३७। मग महाराजांसी । पाचारिलें वेगेंसी । दुशालासह वर्नादिशी । समर्पण केलें । ३८ । करुनी साष्टांग नमन । आशीर्वाद संपादून । दिधलें मार्गस्थ करुन । आले पूर्व स्थळासी । ३९ । मग पत्र लिहुनि वसुमतिसी । आणविलें अपाजी महाराजांसी । भेटउनी चंदुलालांसी । संतोषविलें बहुत । १४० । मादे-वाजवळ ग्राम । धनज तयाचें नाम । झालें गुरुचें पूर्ण काम । इरसाद करोनी । ४१ । सनद देउनी त्यासी । वाटि लाविलें गृहासी । आपण राहिले निश्चयेसी । तेथेंच पै । ४२ । मग चंदुलाल म्हणे आतां । तुम्हा काय द्यावें प्रपंचाकरितां । तंव म्हणति गुरुची सत्ता । काय कमी आहे ।४३। ऐसी विरक्तता पाहुनी । आठ आणे रोजीना परभणी । सवाशे रुपये करवसलीं हुनी । येणेंपरि मिळावे । ४४ । बाळकृष्ण साधु हें नाम । सनदी लिहिलें सुगम । अर्पण केली निष्काम । भवसागरीं तरा-वया । ४५ । मग सकळ भक्तांनीं । गुरुपूजा करुनि । वाटि लाविले महाराजांलागुनी । वंदन करुनी परतले । ४६ । साधुबाई समवेत । पावले वसुमतीत । दर्शन घेतलें समाधीस्त । श्रीतुकारामाचें ।४७। तीन दिवसपर्यंत । राहिले आनंदयुक्त । भेटुनिया समस्तांत । निघते झाले । ४८ । येउनीया परभणीसी । राहिले पूर्व स्थळासी । मग भक्तजन ग्रामवासी । दर्शना पातले । ४९ । सर्वांसी आनंद झाला । ब्रह्मानंदी अचपळा । येणें परी प्रकार झाला । पुढें होईल ते ऐकावें । १५० । ब्रह्मा-नंदा गुणातिता । सच्चिदसुखाघन अनंता । देविकानंद गुरुनाथा । येव

म्हणे सुखी झालो ॥ ५१ ॥ इतिश्री देशिक लीलामृत । पुराण माही कोणते संमत । मुतन कथा सज्जन परिसोत । त्रयोदशोध्याय गोड हा ॥ ५२

# अध्याय १४ वा.

श्रीगुरुभ्योनमः । जय जय सच्चिदानंदा ॥ जय जय आनंद कंदा । जय जय ब्रह्मानंदा ॥ परमपुरुषा तूं ॥ १ । परात्परा नित्य मुक्ता ॥ अकार रहित अव्यक्ता । अखंड सुखभोक्ता ॥ कैवल्य निधी ॥ २ ॥ सलोकता समिपता ॥ स्वरूपता सायोज्यता ॥ चारी मुक्तीचा दाता ॥ होसी सर्वांते ॥ ३ ॥ परी तुझे भक्तरासी । नाहीं इच्छा मोक्षासी ॥ अखंड सेवेसीं ॥ राहती तत्पर ॥ ४ ॥ सेवा थोर सर्वांपरी । ऐसे समजुनी अंतरीं ॥ दृढ धरावे चतुरीं ॥ अंतःकरणांत ॥ ५ ॥ ब्रह्माकार मन व्हावें ॥ सकळ ब्रह्मरूप ध्यावें ॥ ऐसें चिंतन करावे । असावें चित्तासी ॥ ६ ॥ चित्त चिदानंदीं निमाले ॥ दुसरेंपणा विसरलें । केवळ सत्तामात्र उरलें ॥ स्वतःसिध्द ॥ ७ ॥ सकळ करावें साधन । परि साधनाचें मूळ जाणून । यथोक्त करावें निर्गुण ॥ आधी प्रतीते ॥ ८ । मग करावी सगुणसिध्दी । जेणें होय अंतरशुध्दी ॥ याचा विचार ज्ञानबोधी । सांगितला असे । ९ । नित्य करावा विचार ॥ जेणें होय भवाब्धी पार ॥ ऐसा योग वारंवार ॥ घडावा बुध्दीला । १० ॥ बुध्दीनें केले कर्म कोणतें । तें भोगुनी सारावें निरुते । याअविषयीं कर्म तत्वाते ॥ प्रगटविले वामनी ॥ ११ ॥ वामनकृत ग्रंथ ॥ तेणें बोधले यथार्थ ॥ शुध्द साधावया परमार्थ ॥ विवेकसिंधुचा ॥ १२ ॥ विवेकसिंधुपरी ॥ नाहीं कोणाची सरी ॥ एक गीतार्थ ज्ञानेश्वरी ॥ सुरस बोध । १३ ॥ बहुत केले ग्रंथ लोकीं ॥ तेही जाणावे विवेकी । परि एकाचे देखीदेखी ॥ कवित्व केलें । १४ ॥ कितीं व्हावी जगांत ॥ हा हेतू धरिती मनात ॥ त्यासी कैंचा परमार्थ । साधेल तरी । १५ । ज्यासी नाहीं लौकिक साधन ॥ नाहीं कीर्तीचा अभिमान । तेचि जाणावे निपुण । सत्पुरुष प्रारब्धीचे ॥ १६ ॥ आतां सर्वांसी प्रार्थना ॥ करितो धरिजे श्रवणा । त्रयोदश अध्याय पर्यंत रचुन ॥ साक्षी असे ग्रंथाची । १७ । आतां चतु-

वृंश शिखरीचा । कळस अध्याय साचा । यांतील सर्व विचाराचा । अनुभव घेईजे । १८ । पूर्वाध्यायीं साधुबाईसमवेत । बाळकृष्ण आले परभणींत । भक्तजन ग्रामवासी समस्त । दर्शनासी आले । १९ । आतां निरुपण ऐकावें । आत्महितासी बरवे । साधन होय स्वभावे । गुरुकृपा द्वारान । २० । तंव बाळकृष्णासहित । साधुबाई राहून तेथ । मग आणविले कनिष्ट पुत्रांत । त्याच समयीं । २१ । मग आणिली पुत्राचि कांता । दिधली करुनी व्यवस्था । पुढें संतती अद्‌भुता । होती झाली ।२२। मग साधुबाईसी । ठेविलें परभणीसी । आपण निघाले अंट्यासी । गृहाकडे । २३ । येउनी सत्वर गृहाते । आनंदयुक्त समस्ताते । येति सकळ दर्शनाते । महाराजांच्या । २४ । ज्येष्ठ पुत्रासी सांगती । आम्ही जातों शहराप्रति । चलावे आमचे संगती । उदईक सत्वर । २५ । पुत्राहीही पुत्र । झाले सुपवित्र । विवाह केले सर्वत्र । नातू नातीचे ।२६। अनुसया महाराजांची कांता । तिची झाली पूर्ण अवस्था । पावलि स्वर्गपंथा । महा पतिव्रता ती । २७ । तिचे सकळ विधी करून । एक मास तेथें राहून । मग निघाले पुत्रास घेऊन । भागानगरासी । २८ । शहरामाजी जाउनी । राहिले पूर्वस्थानी । सकळ आले दर्शनालागुनी । थोर थोर महाभक्त । २९ । एक संवत्सर पर्यंत । वास केला शहरांत । मग गणेशराय महा भक्त । महा यात्रेसी निघाला । ३० । मंडळीसहित आपण । समागमे बहुत जन । वाटि लावण्यासी घेऊन । परत गेले गृहासी । ३१ । महाराज मार्गीं लावीत । बरोबर आले दोन मुकामात । मग म्हणती आम्हांत । जाऊं द्यावे शहरासी ३२ बहुत आहेत कार्य तेथ । घाट पाहतील समस्त । जाणें आहे वसुमतींत । उत्साह कारणें । ३३ । मग गणेशराय म्हणे आपणासी । जाणें होत नाहीं गृहासी । आमचे समागमे यात्रेसी । नेत आहों । ३४ । ऐकोनी म्हणती त्याते । कांहीं न आणिले खर्चाते । आणखी बरोबर पुत्राते । घेतले नाहीं । ३५ । तंव म्हणें तुम्हाप्रति । कांहीं न्यून नसे निश्चिती । मीच आपुला पुत्र चित्तिं । कल्पना ठेवूं नका । ३६ । ऐकोनि त्याचें वचन । मग पुत्रासी पत्र पाठऊन । तेथें राहावे सावधपण । आम्ही गेलो यात्रेसी । ३७ । येणेंपरि

समाचार । कळविला सारासार । मग निघाले सत्वर । वारानसीप्रति । ३८ । त्यान्यामाजी बैसऊन । बहुत सेवा करिती जन । अखंड गुरुचें भजन । करिती स्वानंदे । ३९ । प्रयाग काशी गया करून । यात्रा झाली संपूर्ण । सहा मास तेथें राहून । परत निघाले । ४० । मग जहागिरीचें गांव पिंपरी । त्याजवरी आली सवरी । तेथुनी आले परभणीवरी । तीन दिवस राहिले । ४१ । गणेशरायाप्रति । महाराज बोलती । शहरास जावें निश्चिती । आपण सर्वत्र । ४२ । आम्ही येथें राहतो सत्य । अंबयासी जाणें अगत्य । दोन्हीकडील गृहकृत्य । पाहूनि येत असो । ४३ । मग गणेशरायानी । महाराजाची पूजा करुनी । अलंकार धन वस्त्र देऊनी । निघता झाला । ४४ । जाउनी शहरांत । आपण पावला गृहांत । ब्राह्मण भोजन अद्भुत । आनंदयुक्त केलें असें । ४५ । महाराज यात्रेहूनि आले । परभणी माजी राहिले । ही वार्ता शहरीं कळलें । भक्तजनासि । ४६ । ज्येष्ठ पुत्र शहराहूनि । आले दर्शनास्तव परभणी । सत्वर लागले चरणीं जनित्याच्या । ४७ । मग शहरचें वर्तमान । कळविलें पित्यालागून । यथ स्थित ऐकून । संतोष झाले । ४८ । कालाष्टक मार्घंदे करून । मग निघाले तेथून । अंबापुरी येऊन । चार मास राहिले । ४९ । नेत्राची दृष्टि कमी झाली । शरीरा क्षीणता आली । मग म्हणति जागा चांगली । पाहुनी तेथें राहवे । ५० । महाराज यात्रेसी गेलेशी । वार्ता साधुबाईस कळली । तवेळीं परभणीहून भोकरा आली । राहती झाली तेथें । ५१ । गयाबाई यमुनाबाई । महाभक्त गंगाबाई । सकळ करिती सेवा पायीं । श्रवण नित्य ज्ञानबोध । ५२ । मग आले उमरीसी । राहिले भक्ताचे गृहासी । आरंभिले ग्रन्थासी । ज्ञानेश्वरीच्या । ५३ । मग ग्रामवासी जन । ऐकोनी जीचे महिमान । चरणी रिघाले शरण । उपदेश घेतले । ५४ । अखंड करिती श्रवण । नित्य त्याचेंची मनन । येणेंपरि अभ्यास करून । राहते झाले । ५५ । प्रतिवर्षीं वसुमतीसी । शुकानंदाचे उत्सहासी । सत्वर जावे नेमेसी । सकळ भक्तासहित ५६ अखंड घेउनी बोध । करावा भक्तासी प्रबोध । महिमा जिचा अगाध । केवळ आत्मविश्रांत । ५७ । नाहीं कोणाची भीड । बोलणें सारे निधड । परी सर्वांसी वाटे

गोड । महा रसीक जे । ५८ । ओकरासी जाउनी त्वरित । गुरुचें ध्यान अखंडीत । लागला चरणाच्या हेत । महाराजांच्या । ५९ । मग ज्वर उठला शरीरीं । तंव सर्वांसी आज्ञा करी । पत्र पाठउनी उमरी । भक्त-मंडळी आणावे । ६० । निर्याणाचा काळ आला । प्राण व्याकुळ बहु झाला । धाउनी आले दर्शना । भक्तजन सर्वत्र । ६१ । भाद्रपद कृष्ण अाष्टमी । ते दिनीं पावले परधामीं । समाधि केली प्रामीं । साधुबा-हूंची स्वानंदे । ६२ । मग सकळ वर्तमान । लिहुनी पाठविलें त्वरेन । तें महाराज सर्व ऐकून । ओंढ्याहुनी निघाले । ६३ । मग येऊनि ओकरांत । अवलोकिलें समाधींत । महा खेद मनांत । नेत्रीं अश्रु लोटिले ।६४। सकळ गुण आठउनी । मग पद रचना करुनी । उमरींत येऊनि । राहिले चार मास । ६५ । सकळ भक्तजनांसी । समाधान केलें दिन-निशी । अनन्यभावें चरणांसी । लोळती सकळ । ६६ । षोडशोपचारे महाराजांचे करून । मग निघाले सकळ जन । वसुमतिप्रति ।६७। एक शुकानंदाचे मठीं । समाधि अवलोकिली दृष्टि । घेउनी सर्वत्रांची भेटी । उत्साह केला स्वानंदे । ६८ । मग भक्तांसी निरोप देउनी । सर्वांसि पाठविले सदनीं । आपण निघाले तेथुनी । परभणीसी पावले । ६९ । मासपर्यंत । राहुनी निघाले त्वरित । अंबापुरी गृहांत । पावते झाले ।७०। तीन मास राहुनी तेथ । मग आले परभणींत । सर्वांसी भेटुनि त्वरित । निघाले नांदेडाप्रति । ७१ । बाबा महाराजांसी भेटून । तीन दिवस तेथें राहून । मग उमरीस येऊन । भक्तजन संतोषविले । ७२ । अठरा मास राहुनी । भक्तांसी कृतार्थ करुनी । आनंद सर्वांसी होउनी । पूजा करिती सकळ ७३ मग म्हणती सर्वांसी । आम्ही जातो गृहासी । सत्वर निघुनी वसुमतिसी । गुरुदर्शन घेतलें ।७४। तीन दिवस राहुनी । मग निघाले तेथुनी । परभणीसी जाउनी । अंबासी मग आले ।७५। मग जाउनी बिडासी । सकळ साधिलें कार्यांसी । नंतर येवोनी गृहासी । राहाते झाले । ७६ । तेथुनी एक मासपर्यंत । राहिले परभणींत । सुर-दास आणि पुत्रासमवेत । निघते झाले सत्वरी । ७७ । येउनी वसुम-तिसी । उत्साह केला अश्विन मासीं । मग दिवाळीसी । उमरीस आले

। ७८ । सर्वत्र भक्तजन। येऊं आले दर्शन । आनंदे भरलें त्रिभुवन । कोण तेथ गणना करी । ७९ । मग तीन दिवसानंतर । अंगीं उलटला शीतज्वर । क्षीण झालें शरीर । बहुत महाराजांचें । ८० । तंव सर्वांसि सांगती । आमची निर्याणाची स्थिती । आली असे निश्चिती । स्थळ शुध्द पाहावें । ८१ । परी सर्वांसी नाहीं कळलें । शरीर ठेवतील या वेळें । सकळास बोलती चांगलें । शहरास जाईं नेहमीं । ८२ । नऊ दिवसपर्यंत । कष्टी झालें बहुत । तितक्यामाजी जामात । बाबामहाराजांचे । ८३ । कुटुंबासहित आपण । आले तेव्हां मुधोळाहून । जाणार सुमतिकारण । सहज आले दर्शनासी । ८४ । महाराजासी वंदून करुनी । जवळ बैसले येऊनी । तंव उभयतांसी पोटीं धरुनी । आलिंगन दिधलें । ८५ । महाराज म्हणति आतां । आली नयनीं अवस्था । संन्यास घ्यावा निश्चिता । सत्वर पैं । ८६ । तंव म्हणें आपणासी । आम्ही काय करावें संन्यासी । आपण स्वतःसिध्द जगदेशी । मग घेणें तें काय असें । ८७ । ऐकोनि म्हणति सत्वरी । लोकांसी दिसावें बाहेरी । संन्यास आहे अंतरीं । न कळे कोणाते । ८८ । यासाठीं लोकेशना । साधावि बरवे वचना । कोणीं न ठेवावें दुषणा । म्हणोनी घेणें संन्यास । ८९ । सत्य मानुनी प्रियवचन । तत्क्षणीं केलें प्रेश उच्चारून । शिखासुत्र तोडून । काशाय वस्त्र दिधलें ।९०। यति नाम चंद्रचूड । ठेविलें करुनि उघड । दर्शनाची धरुनी चाड । गांवोगांवीचे भक्त येती । ९१ । अखंड करिती भजन । नाहीं कोणासी चहून । धर्म करिती संपूर्ण । अतित ब्राह्मणासी । ९२ । ब्रह्मानंदे डोलती सकळ । नामघोष करिती अस्थळ । बाबाच्या झाला रोळ । एकची गजर वर्तला । ९३ । शके सतराशे चव--य्शानव । संवत्सर अंगीरानाव । मास कार्तिक शुध्द तंव । तिथी एकादशी । ९४ । सोमवार प्रातःकाळीं । सकळा बोलाविलें जवळें । सुखी राहावे भक्तमंडळी । आनंदयुक्त सर्वदा ।९५। आम्ही जातो निजधामा । गुरुची आज्ञा झाली आम्हा । सांगितलें निजवर्मा । सावध असावें ।९६। सकळ म्हणति आम्हासी । टाकुनी जातां परमधामासी । करितां दीनाला परदेशी । कैसे होईल भक्ताचे । ९७ । रात्रंदिवस आपणासाठीं । चरणीं

ठेउनी दृष्टि । वारंवार इच्छा पोटीं । साकार दर्शन घडावें । ९८ । आज निधानीचें वचन। ऐकोनी उदास झालें मन । हर्षी भरलें नयन । कोण आतां सांभाळी । ९९ । दिनोध्दारा त्रितापहारणा । सर्व अविद्या मूळ दहना । अपरोक्ष दाविलें चरणा । निज दासासी । १०० । अगाध स्वरुपाचा बोध । दाविले स्वरूप शुध्द । अनंत अपराध । क्षमा केले दासाचे ।१। ऐसे करुणेचे सागरु । कृपेचे महा मेरु । आनंदाचे माहेरु । निज भक्तासी । २ । अखंड केले सुखरूप । निवारिले त्रिविध ताप । जन्म मरणाची खेप । चुकविली दासाची । ३ । येणेंपरी करुनी स्तवन । धरिलें गुरूचें चरण । कृपाधर संपादून । आनंदासी पावले । ४ । मग सद्गुरुनाथानीं । वज्रासन घालुनी । गुरूमुद्रा करुनी । वंदन केलें पादुकेचें । ५ । बैसुनी ध्यानस्थ । प्राण ओढिलें समस्त । ब्रह्मांडीं सावचित्त । स्थीर झालें । ६ । नारायण उच्चारूनी । इंद्रिय अकर्षुनी । मुख्य प्राण सोडुनी । समाधीस्त झाले । ७ । अखंड समाधि लाविली । निर्गुण दशा पावली । नेत्र उभय साकिली । सदोदित ।८। आत्म स्वरूपीं मिळाला । निजस्थानासी पावला । गंगा भेटली सागराला । एकत्र झाले । ९ । प्रतिबिंब मिळाला बिंबीं । आकाश पावले नभीं । तेज निघाले गर्भीं । भानु अस्ताते । ११० । नभ सुवर्ण झाले एक । पट तंतु हें कौतुक । जीव शिव सम्यक । ऐक्य झालें । ११ । तरंग झालें पाणी । गार गेली विघरुनी । घट मृतिका होउनी । राहिली असे । १२ । कापूर मिळाला दिपासी । लवन मिळाले जळासी । निर्यानाची स्थिती ऐसी । पाहिली सर्वानें । १३ । अपार दाटी झाली । सकळ पूजा आरंभीली । नानापरीची वाहिली । पुष्प बिल्व माळा । १४ । बहुपरी नैवेद्यासी । समर्पुनी गुरुसी । आरती करुनी कापुरासी । उजळती बहुत । १५ । कोणी नमस्कार करिती । कोणी प्रदक्षिणा घालिती । नाना वाद्य वाजती । भजन मांडिलें अपार । १६ । निरहार वृत वर्तासी । सकळ जन ग्रामवासी । धाउनी येती दर्शनासी । ब्रह्मानंदे करुनीया । १७ । तंव झाला सूर्य अस्तमान । मग सिध्द केलें विमान । महाराजासी स्नान घालून । वस्त्र दुशाल पांघरिली । १८ । सुगंधीक चंदन । सर्वांगा केलें लेपन ।

नाना पुष्प हार वाहून । बिल्वदळ अर्पिलें । १९ । ऐसी करूनी पूजा । विमानीं बैसविले गुरूराजा । आरती ओवाळी ओजा । सर्व भक्तांनि । १२० । जय जयकार करूनी । स्वामीसी घेतले उचलुनी । द्वाराबाहेर नेउनी । निघते झाले ।२१। ते पर्यंत समाधिस्थान । विवर एक सिध्द करून । धावत आले जन । महाराजापाशी । २२ । पुढें वाजविती वाद्य अपारे । भजन करिती एकसरे । गुण आठविती नाना प्रकारें । प्रेमयुक्त अंतरीं । २३ । मग लाऊनी मशाली । चंद्रज्योति प्रकाशीली । नळे बंदुकी उडऊं लागली । एकची गजर झाला । २४ । क्षुधा तृशा विसरून । लहान थोर सकळ जन । आनंदे करिती भजन । सद्‍गुरूस्वामीपुढें । २५ । कोणी कुंखाचे सडे घालिती । कोणी प्रसाद पेढे वाटिती । कोणी खुरदा रुपये उधळिती । अणीक पुष्प सुवर्णाचे । २६ । घरोघरींच्या नारी । आरत्या घेऊनि करी । लोळती चरणावरी । अनन्य भावे ।२७। ऐसा करूनी गजर । मिरउनी सारे नगर । आले ग्रामाबाहिर । समाधि स्थळासी २८ वाळु लवन भस्म बिल्व तुळसी । मध्यें बैसऊनी स्वामीसी । पूजा करूनी सायासी । वंदन केलें सर्वांनीं । २९ । मग लव घातिलें वरी । बिल्व तुळसी नानापरी । वाळु भस्म त्यावरी । आच्छादन सर्व केलें । १३० । शिळा ठेउनी द्वारीं । मृत्तिका घातली वरी । समाधि करूनि बरी । केली शिवस्थापना । ३१ । सर्वांनी केलें वंदन । मग प्रदक्षिणा घालून । साष्टांग केलें वंदन । समाधिसी । ३२ । आजपर्यंत आम्हासी । वत्सापरी पाळिलेसी । आतां त्यागिले दासासी । करूणाकर दयाळा । ३३ । आम्ही अज्ञानी सकळ । कोण करील सांभाळ । म्हणुनी पादकमळ । वंदिती सर्वदा । ३४ । नेत्रीं वाहतो जळधारा । शोक करिती एकसरा । शिव शिव हे शंकरा । कैसें केलें आम्हासी । ३५ । नानाप्रकरें शोक करूनी । अपार गुण आठऊनी । मग शांत होऊनी । पावले निज सदना । ३६ । अखंड करिती गुरूस्मरण । नित्य मांडिलें गुरूभजन । पुत्रानें केलें यथा विधीन । धर्म वर्णाश्रमाचें । ३७ । मग तेरावे दिवशीं । महा उत्सव केला सायासी । भोजना दिधले ब्राह्मणासी । भक्तजन समवेत । ३८ । येणेंपरी आनंद करूनि । समाधीस काम

छाडनी । धर्मशाळा बांधुनी । स्थळ सिध्द करविलें ३९ अघटित करूनि गुरुची । महिमा न वर्णवे साची । अपार घटना त्याची । न कळे काय होईल तें । १४० । दक्षिणेसी विठ्ठल मंदिर । पश्चिमेसी शिवशंकर । वामेतरांक तीर्थ थोर । पूर्वग्राम वस्ती असे । ४१ । येणेंपरीचें स्थान । अगाध ज्याचें महिमान । अखंड होती भजन पूजन । श्रीदेशिकानंदाचें । ४२ । देशिकानंद चरित्र । कथिले सारासार पवित्र । साग्र लिहितां सिंधुपात्र । अपुरें होईल । ४३ । चवदा अध्याय पर्यंत । झालें कथन समस्त । याचें करावें अखंडित । पारायण भक्तीनें । ४४ । होती सकळ कर्माचें दहन । अक्षय पावे पूर्णज्ञान । विजयी सर्वदा कल्याण । होईल तयाचें । ४५ । श्रवण करिती नित्य । त्याचें दूर होईल अनित्य । ब्रह्म-रूप होईल सत्य । असत्य नोहे कल्पांती । ४६ । ज्याची कामना असेल जैसी । प्राप्ती होईल तया तैसी । हें जाणोनी वर्म मानसी । आचरण करावें । ४७ । अर्थ पुत्र दारा धन । सौभाग्यवृध्दि अयुष्य वर्धन । सकळ रोग परी हरण । पठणमात्रें होती ४८ भव भय दुःख दूर होते । तत्क्षणीं पावे मुक्तीते । ऐसें जाणोनि वर्माते । अनुष्टान करावें । ४९ । नित्य करितां अभ्यास । त्यासी नलगे सायास । अखंड पावे निजपदास । प्रसादे गुरुच्या । १५० । हा गुरुप्रसादिक ग्रंथ । झाला असे महा समर्थ । याचा जाणोनि परम अर्थ । अनुभव घेईजे । ५१ । हें सकळ गुह्याचें सार । वेदाचें बीज अक्षर । अमृताचे पाझर । सुटले असे । ५२ । प्रथ-माध्यायीं मंगलाचरण । गदाधराचें अख्यान । सारासार सांगून । अध्याय पूर्ण केला । ५३ । दुसरेमाजी बाळकृष्ण जन्म । विवाह झाला सुगम । बाललीला परम । कथिला असे ।५४। तिसरेमाजी विद्या पूर्ण । केलें विश प्राशन । अपार नवस करून । संजीवन केलें । ५५ । वतन-दारीचें काम केलें । पित्यासी संतोषविलें । पैठणासी जाऊनी आले । हेचि निरूपण चतुर्थांत । ५६ । पांचव्यांत व्यापार करूनी । धन बहुत मिळवुनी । मग नेलें तें तत्कालीं । तंव अनुष्टान मांडिलें । ५७ । सहाव्यांत मुकुंदराज विवरीं । दृष्टांत झाले नानापरी । शिव येऊनि सत्वरी । प्रसन्न झाला । ५८ । सातव्यामाजी कथन । शुभानंद अंगास

घेऊन । बालकृष्णासी उपदेश करून । नांदेडासी पावले ।५९। अठवा नववा दशम । तिन्ही माजी ज्ञान परम । एकादशीत अन्वय धर्म । हटयोग सांगितला । १६० । द्वादशींत तीर्थाटन । बालकृष्ण वनांत राहून । बहुत श्रमी होऊन । मग आले कथसहिसी । ६१ । तेराव्यांत चंदुलाल भेटी । अपार साधुबाईची कोटी । जाहगीर मिळ-विली कष्टी । अर्पिली श्रीगुरुते । ६२ । चवदाव्यांत निर्याण । साधुबा-ईचे भोकशीं होऊन । मग देशिकनंदाचे अगाध गुण । वर्णन झालें असें । ६३ । शेवटीं झाले संन्यासी । पावले परमधामासी । समाधान केलें भक्तासी । ब्रह्मानंदे करूनिया । ६४ । येणेंपरी चतुर्दश अध्याय । कथा झाली अप्रमेय । हें ज्यासी प्राप्त होय । त्रिभुवनीं धन्य तोचि । ६५ । जैसे चौदा विद्यासार । चवदा भुवन थोर । चौदा रत्न सुन्दर । भुमी-वरी । ६६ । अनंत चौदा गाठीचा । शिवमहिमा चवदा तिथीचा । ऐसें महत्म हे साचा । जाणिजे सर्वत्र । ६७ । या ग्रंथाची थोरी । मुक्त होती संसारीं । यदर्थी पठण करी । वारंवार आदरे । ६८ । नांदेडाप्रति क्षेत्र । उमरी नाम पवित्र । गुरूद्वारीं बैसुनी चरित्र । रचना केली असे । ६९ । देशिकानंद माझा गुरु । मी त्याचा दास किंकरु । माझे मुखानें उच्चारू । करविला ग्रंथाचा । १७० । ग्रंथाचें नाम अघटित । ठेविलें देशिक लीलामृत । भवरोगीयासी अमृत । जाणावे सत्य पैं । ७१ । शाके सतराशे ब्याहानव । संवत्सराचें नाम भाव । मास आषाढ अधीक तंव । शुध्द पक्ष जाणिजे । ७२ । तिथी पूर्णादशमी । बुधवार सिध्द कर्मी । माध्यान्ह काळ गुरुधामी । ग्रंथ संपविला । ७३ । जयजय गुरू मंगळा । परम प्रीयकर दयाळा । अगाध दाविली लीला । निज भक्तासी । ७४ । अखंड अद्वय तुझा बोध । मज लाधला अगाध । म्हणोनी मति झाली शुध्द । निजकृपे ग्रन्थासी । ७५ । हें सकळ तुझें स्तवन । तुझें तुज केलें अर्पण । धरिलें दोन्ही चरण । अनन्यभावें । ७६ । आतां झालों कृत कृत्य । नाहीं वर्णाचें अगत्य । एक सद्गुरू चरण सत्य । धरिलें असें ।७७। नित्य करितो भजन । अखंड श्रीपाद पुजन । तुझें ठाईं ध्यान । निज दासासी ।७८। लक्ष्मणदास तुझा । नाम पावलो ब्रह्मानंद सहजा ।

। सकळ निजकाजा । दासा हातीं सत्वर । ७९ । मुख्य कुंडल ऊका । श्रीचक्र गुरु पादुका । दिधलें प्रितीनें सेवका । अधिकार रवें । १८० । कैवल्यनाथ कैवारी । भक्तसंकट निवारी । म्हणूनि तुझे द्वारीं । ध्यानरूपीं राहिलों । ८१ । नित्यानंदा पूर्ण सखया । अगाध किर्ती केली राया । देशिकानंद गुरुवर्या । दोष म्हणें मुक्त झालों । ८२ । इतिश्री देशिक लीळामृत । पुराण नाहीं कोणते संमत । नुतन कथा सज्जन परिसोत । चतुर्दशोध्याय गोड हा । १८३ ।

श्रीगुरुराजार्पण मस्तु । शुभंभवतु । समाप्तः ॥

शके १८१९ हेमलंबनाम संवत्सर मार्गेश्वर शुध्द १ गुरुवासरे तद्दिने लिखीतं सदानंद देशिकेंद्र शुकानंदनाथार्पणमस्तु ॥

